अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ८२

प. पू. श्रीमद् सुरेश्वराचार्य विरचित

# मानसोल्लास

(श्रीमद् आद्य शंकराचार्य विरचित दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील वार्तिक)

संपादन व अनुवाद
डॉ. उदय कुमठेकर

प्रधानसंपादक
आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु

संपादक
आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)

२०२०

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | — | **मानसोल्लास** |
| **संपादन व अनुवाद** | — | **डॉ. उदय कुमठेकर** |
| **प्रधानसंपादक** | — | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | — | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन** | — | **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष<br>**प्रो. सरोजा भाटे,** सचिव<br>**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष |
| **संपादक मंडळ** | — | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीणा गानु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | — | **२०२०** |
| **आवृत्ती** | — | **प्रथम** |
| **मूल्य** | — | **रू. ३१७/–** |
| **आय.एस.बी.एन.** | — | ९७८–९३–८५७१०–३९–१ |
| **मुखपृष्ठ** | — | **श्री. उमेश पाटील** |
| **मुद्रक** | — | **अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टींग, नागपूर** |
| **प्रकाशक** | — | **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**<br>**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek — Prof. Shrinivasa Varakhedi
10th January 2020 — Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

## दोन-शब्द

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचे प्रथम शिष्य पूज्यपाद श्री सुरेश्वराचार्य यांचे शांकर-वेदान्ताच्या इतिहासातील स्थान 'वार्तिककार' म्हणून अनन्यसाधारण असे आहे. बृहदारण्यक उपनिषद् वार्तिका सारख्या बृहद् रचने सोबतच आचार्यांच्या पंचिकरण, श्री दक्षिणामूर्ती स्तोत्र अशा अगदी लहान परंतु तत्त्वार्थगर्भ रचनांवरील त्यांची वार्तिकेही प्रसिद्ध आहेत.

प्रस्तुत ग्रंथात आचार्यांच्या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील त्यांच्या वार्तिकाचा मराठी अनुवाद मुळासह प्रस्तुत करण्यात आला आहे.

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्र वार्तिक अर्थात् 'मानसोल्लास' या ग्रंथावर म.म. वेदान्तविशारद श्रीमद् अनन्तकृष्ण शास्त्री यांची 'मानसोल्लासवर्धिनी' नामक संस्कृत टीका तसेच श्रीमत् श्री दक्षिणामूर्ती पिठाधीश्वर आचार्य महामंडलेश्वर श्री महेशानन्द गिरी यांची हिन्दी निरूपणे प्रसिद्ध आहेत. या ग्रंथांचे सहाय्य प्रस्तुत अनुवादास झाले आहे.

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्र वार्तिकाचा अन्वयार्थ समजून येणे केवळ अर्थ निरूपणाच्या आधारे खरे तर शक्य नाही. या ग्रंथात संक्षिप्त श्लोकार्थ निरूपण मात्र केले आहे. तसे पाहता या वार्तिकातील विविध दार्शनिक संकल्पना व योगसाधनेची अंगे परिपूर्णपणे स्पष्ट होण्यासाठी तसेच वार्तिककारांना अभिप्रेत असलेले श्रुती संदर्भ स्पष्ट होण्यासाठी सविस्तर भाष्य करणेच आवश्यक आहे. त्यासाठी आवश्यक सद्‌गुरूकृपेचा लाभ झाल्यास तसे निश्चितच करता येईल. या ग्रंथाचा विश्लेषणात्मक अभ्यास हा एखाद्या प्रबंधाचा विषयही होऊ शकेल!

या ग्रंथाच्या अक्षर जुळणीत नांदेड येथिल श्री प्रिंट ॲन्ड मेडियाचे श्रीनिवास बुलबुले व त्यांची सहधर्मचारिणी वृंदा तसेच मुकुंद व राजेश यांचे सहाय्य झाले आहे.

श्री कविकुलगुरू कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेकचे डॉ. पेन्ना यांनी उदार अंत:करणाने हा ग्रंथ विद्यापीठातर्फे प्रकाशित करण्यास मान्यता दिली त्यांचाही मी ऋणी आहे. तसेच डॉ. दिनकर मराठे आणि डॉ. (सौ.) वीणा गानू यांचे सहकार्यही लाभले आहे. अनुवादात जर कांही दोष राहीले असतील तर विद्‌वज्जनांनी क्षमा करावी.

**।। श्रीमद् आचार्य चरणार्पणमस्तु ।।**

❖❖❖

**श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य आद्य शंकराचार्य**



**श्रृति स्मृति पुराणानां आलयं करुणालयं।**
**नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम् ।।**

# प्राक्-कथन

**आद्य शंकराचार्य - गुरूशिष्य परंपरा**

केरळ राज्यात कालटी नावाचे एक गाव आहे. पूर्वी हे एक लहानसे खेडे होते. विद्याधिराज नावाचा एक शीलसंपन्न ब्राह्मण या गावी एक छोटेसे गुरूकुल चालवित असे. विद्याधिराजाच्या मुलाचे नाव होते शिवगुरू. शिवगुरू देखील आपल्या पित्याप्रमाणेच शास्त्रसंपन्न आणि शीलसंपन्न होता. शिवगुरूच्या पत्नीचे नाव होते आर्यम्बा. आर्यम्बा ही केरळातील त्रिसूर जिल्ह्यातील पंजरपल्ले ग्रामातील मखपंडित नामक एका ब्राह्मणाची कन्या होती.

शिवगुरू-आर्यम्बेला पुत्र नव्हता. त्यांनी त्रिसूरजवळील वृषाचल क्षेत्री महादेवाची उपासना केली. तपश्चर्या चालू असताना शिवगुरूंना एक मोठे सूचक स्वप्न पडले. भगवान् शंकराने प्रकट होऊन शिवगुरूंना विचारले की, 'तुला सामान्य बुद्धीचे दीर्घायुषी असे अनेक पुत्र हवेत की, असामान्य बुद्धीचा परंतु अल्पायू असा एकच सुपुत्र हवा?' त्याने हे स्वप्न आर्यम्बेला सांगितले. दोघांपुढे मोठा प्रश्न पडला. काय मागावे हे सूचेना! म्हणून त्यांनी निर्णय भगवंतांच्या इच्छेवर सोडला. भगवान् शंकरांनी पुन्हा स्वप्नात दर्शन देऊन सांगितले की, 'मी स्वत:च तुमच्या उदरी अंशरूपाने जन्म घेईल; परंतु मी तेथे अल्पकाळच राहीन.'

वैशाख शुद्ध पंचमी युधिष्ठिर शके २६३१, इ.स.पू. ५०९, रविवार दुपारी १२.०० वाजण्याच्या सुमारास भगवान् शंकराच्या अंशावताराचा जन्म झाला. त्याचे नांवही '**शंकर**' ठेवण्यात आले.

**बालपण :**

छोट्या शंकराला वयाच्या पाचव्या वर्षीच गुरूकुलात पाठविण्यात आले. त्याचे प्राथमिक शिक्षण स्थानिक पाठशाळेतच झाले. अलौकिक बुद्धिमत्ता आणि ग्रहणशक्ती असलेल्या त्या द्रविड शिशूने आपले अध्ययन अत्यंत शीघ्र गतीने पूर्ण केले.

**अष्टवर्षे चतुर्वेदी द्वादशे सर्वशास्त्रविद्।**
**षोडशे कृतवान् भाष्यम् द्वात्रिंशे मुनिरभ्यगात्।।**

'आठव्या वर्षी चार वेदांचे अध्ययन पूर्ण झाले; तर बाराव्या वर्षी तो सर्व शास्त्रांचा ज्ञाता झाला. सोळाव्या वर्षी त्याने भाष्यरचना केली तर बत्तिसाव्या वर्षी तो दिव्यलोकी परतला.'

हा श्लोक बालशंकराचा जीवनपटच संक्षेपाने उलगडून ठेवतो.

बालशंकराचे उपनयन झाल्यानंतर काही दिवसातच शिवगुरूंचे निर्वाण झाले.

**संन्यासाचा अलौकिक हट्ट :**

आपले जीवनकार्य काय आहे याची स्पष्ट कल्पना बालशंकराला होती. धर्मतत्त्वांविषयी समाजात मोठे अराजक माजलेले आहे. वेदांविषयी अनादर निर्माण केला जात आहे. सनातन वैदिक धर्ममार्गापासून लोक भ्रष्ट झालेले आहेत. वेदांची पुन:स्थापना व्हावयास हवी. सनातन वैदिक धर्माचा पुनः प्रचार–प्रसार व्हावयास हवा. हे सर्व कार्य करून लोकयात्रेला योग्य वळण देण्यासाठी, लोकोद्धारासाठी आपण संन्यास घ्यावयास हवा, अशी शंकराची दृढ भूमिका होती.

शंकराने आपल्या आईजवळ संन्यासाची अनुमती मागितली. आपल्या एकुलत्या एक नवसासायासाने झालेल्या लेकराला ती माऊली कशी बरे अनुमती देणार !

बालशंकराला त्या माऊलीने संन्यासाची अनुमती द्यावी ह्यासाठी ऋषीजनांनी आर्यम्बेच्या स्वप्नात येऊन विनंती केल्याची, तसेच शंकर नदीवर स्नानास गेला असता मगरीने त्याचा पाय धरल्याच्या कथा प्रचलित आहेत. तथापि शंकराने संन्यास घेणे कसे आवश्यक आहे हे समजण्याएवढी परिपक्क बुद्धि त्या माऊलीजवळ अवश्य होती. संन्यासाची आवश्यकता शंकराने आपल्या आईला पटवून दिली. एका अलौकिक पुत्राचा एक अलौकिक हट्ट एका अलौकिक मातेने पूर्ण केला ! शंकर आपल्या आईला म्हणतो....

**संन्यस्तवान् शिशुरयं विधवामनायां**
**क्षिप्त्वेति मां प्रति कदापि न चिन्तनीयं।**
**यावन्मया स्थितवता फलमापनीयं**
**मातस्ततः शतगुणं फलमापयिष्ये।।**

‘आई....! हा मुलगा अनाथ विधवेला टाकून संन्यास घेऊन निघून गेला. असा विचार तू माझ्याविषयी कधीही करू नकोस. कारण मी तुझ्याजवळ राहून जेवढे कार्य करीन त्याच्या शंभरपट अधिक मी संन्यास घेऊन करू शकेन.’

केवढा हा आत्मविश्वास !

शंकर आपल्या आईला म्हणाला.....

‘आई, रात्र असो अथवा दिवस असो किंवा कोणतीही वेळ असो, तू माझे भावस्मरण कर ! मला निरोप पाठव; मी हातातली सगळी कामे टाकून तुझ्याकडे धावत येईन. मी तुला वचन देतो की, तुझे अंत्यसंस्कार मी स्वतःच करीन.’

शंकराने घर सोडण्यापूर्वी काही आवश्यक बाबी केल्या. कालटीच्या पूर्णा नदीचा प्रवाह बदलून तो घराजवळून नेला. आईला पाण्याची सोय झाली. श्रीकृष्णाच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला. आपल्या सर्व मालमत्तेची व्यवस्था लावली. सर्व मालमत्ता आईच्या एका नातलगाकडे सोपवली. आईची सोय झाली. शंकराने आपल्या आईला विनम्र वंदन केले आणि भावव्याकुळ होऊन निरोप घेतला. तो दिवस होता कार्तिक शुक्ल एकादशी, युधिष्ठिर शके २६३९, इ.स.पू. ५००.

गुरूच्या शोधार्थ मार्गक्रमण सुरू झाले!

**गुरूच्या शोधात :**

कालटीला पाठशाळेत असतानाच शंकराने वेदांताचे सर्वश्रेष्ठ गुरू श्री गोविंद भगवद्पाद यांचे नाव ऐकलेले होते. गोकर्णक्षेत्री शंकराला त्याचा बालमित्र विष्णुशर्मा भेटला. विष्णुशर्माही त्याच्यासोबत निघाला. हाच पुढे चित्सुखाचार्य नावाने ख्यातनाम झाला. ओंकार मांधाता या ज्योतिर्लिंगक्षेत्री गोविंदयती राहतात असे त्यांना समजले. त्या दिशेने त्यांचा प्रवास सुरू झाला. गोविंदयतींच्या कानांवरही ह्या अलौकिक बुद्धिमत्तेच्या बालकाची कीर्ति गेलेलीच होती.

गोविंदयतींची पूर्वपीठिका म्हणजेच आचार्यांचीही गुरूपंरपरा सांगणारा श्लोक असा.....

**नारायणं पद्मभवं वसिष्ठं**
**शक्तिं च तत्पुत्र पराशरंच।**
**व्यासं शुकं गौडपादं महान्तं**
**गोविन्दयोगीन्द्रमथास्य शिष्यं।।**
**श्रीशंकराचार्यमथास्य पद्म-**
**पादंच हस्तामलकंच शिष्यम्।**
**तं तोटकं वार्तिककारमन्यान्**
**अस्मद् गुरूं संततमानतोऽस्मि।।**

नारायण-ब्रह्मदेव-वसिष्ठ-शक्ती-पराशर-व्यास-शुक-गौडपाद-गोविंदयती -शंकराचार्य-अशी ही गुरू शिष्य परंपरा. यानंतरचे पद्मपाद, हस्तामलक, तोटक आणि वार्तिककार सुरेश्वराचार्य हे चार पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचे शिष्य.

यापैकी गौडपाद हे व्याकरणमहाभाष्यकार पतंजलीकडे व्याकरण शिकलेले. ते गुरूच्या शापामुळे ब्रह्मराक्षस झाले होते, अशी त्यांच्याविषयी आख्यायिका आहे. गौडपाद क्षिप्रा नदीच्या काठावर उज्जैनीला राहत असत. तेथे व्याकरणाचे

अध्ययन करण्यासाठी काश्मिरमधून चंद्रशर्मा आला. गौडपादांनी चंद्रशर्म्याची बुद्धिमत्ता पाहून त्यास 'पातंजल महाभाष्य' शिकविले. शिष्याला ज्ञान दिल्यावर ते गुरूच्या शापातूनही मुक्त झाले. कारण 'उत्तम शिष्याला ज्ञान दिल्यास ब्रह्मराक्षस अवस्थेतून मुक्त होशील', असा गुरूचा उ:शापही त्यास होता. हा चंद्रशर्मा म्हणजेच गुरू गोविंदयती. यांनी पुढे नर्मदा नदीच्या तिरी एक आश्रम स्थापन केला.

**गोविंदयतींची भेट :**

गुरूचा शोध घेत निघालेले शंकर आणि विष्णुशर्मा गोविंदयतींच्या आश्रमापर्यंत पोहोचले. गुरूंचे दर्शन घेतले, गुरूंचे निवासस्थान असलेल्या गुंफेभोवती तीन प्रदक्षिणा घातल्या. तेथे त्यांची भावसमाधी लागली. तेथे त्यांनी रचलेले श्लोक 'स्वात्मनिरूपण' म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यातील पहिला श्लोक असा.....

**शरणं भवति न जननी न पिता**
**न सुतो न सोदरा अन्ये।**
**परमं शरणमिदं स्याच्चरणं मम**
**मुर्ध्नि देशिकन्यस्तम्।।**

'मोक्षप्राप्तीसाठी माता, पिता, पुत्र किंवा बहीण – भाऊ किंवा इतर संबंधीजन हे कोणीच आधार ठरू शकत नाहीत. त्यासाठी सर्वश्रेष्ठ ठरतो तो गुरूने माझ्या मस्तकावर ठेवलेला पायच.'

हे शब्द ऐकून गुरू गोविंदयतींनी विचारले, 'मुला, तू कोण ?'

ह्या प्रश्नाच्या उत्तरादाखल शंकराने 'निर्वाणषटक्' रचले. त्यातील पहिला श्लोक असा.....

**मनोबुद्ध्यहंकारचित्तानि नाहं**
**न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे।**
**न च व्योम भूमिर्नतेजो न वायुः**
**चिदानंदरूपम् शिवोऽहं केवलम्।।**

तेथेच शंकराने '**आत्मपंचक**' व '**दशश्लोकी**' यांचीही रचना केली.

गोविंदयतींच्या आश्रमात शंकर तीन महिने राहिला. तेथे त्याचा 'षड्दर्शने' आणि 'वेदांता' चा अभ्यास पूर्ण झाला. गोविंदयतींनी शंकराला औपचारिक संन्यास देण्याचे ठरविले. त्यांनी त्यास चार महावाक्यांचा उपदेश केला....

**अहम् ब्रह्मास्मि।**
**तत् त्वम् असि।**

**प्रज्ञानम् ब्रह्म।**
**अयम् आत्मा ब्रह्म।।**

हीच ती चार वाक्ये.

आता शंकर हा '**शंकराचार्य**' म्हणून ओळखला जाऊ लागला. तो दिवस होता फाल्गुन वद्य द्वितीया, युधिष्ठिर शके २६४०, इ.स.पू. ५००.

गोविंदयतींच्या आश्रमात असताना शंकराचार्यांनी केलेली एक महत्त्वाची रचना म्हणजे '**विवेकचुडामणी**' होय. ५८१ श्लोकांच्या ह्या गुरू-शिष्य संवादरूप ग्रंथात वेदांत तत्त्वज्ञानाचे सार सोप्या भाषेत स्पष्ट करण्यात आलेले आहेत.

या वास्तव्याच्या काळातच नर्मदेला पूर आला. आचार्यांनी मोठे धैर्य प्रदर्शित करून आपल्या गुरूंसह इतरांचेही प्राण वाचविले.

पुराच्या प्रसंगानंतर गोविंदयती शंकराचार्यांसह आपल्या गुरूंकडे म्हणजे गौडपादाचार्यांकडे बदरीकाश्रमी आले. गौडपादांची रचना म्हणजे '**मांडुक्यकारिका**' होय. गौडपादांच्या तोंडून '**मांडुक्यकारिका**' ऐकून गोविंदयती आणि आचार्य नर्मदातिरी परतले.

**भाष्यरचनेचा आदेश :**

गोविंदयतींनी आता शंकराचार्यांना आज्ञा केली की, 'पृथ्वीवरील सर्वश्रेष्ठ नगरी, ब्रह्मविद्येचे माहेरघरच अशा काशीक्षेत्री जा आणि तेथे राहून प्रस्थानत्रयीवर भाष्यरचना कर!'

शंकराचार्य आणि विष्णुशर्मा मजल दरमजल करीत काशीला आले. त्यांनी तेथील विविध स्थळांना भेटी दिल्या. तेथेच '**काशी - पंचक**', '**गंगाष्टक**', '**मणिकर्णिकाष्टक**', '**अन्नपूर्णास्तोत्र**', आणि '**कालभैरवाष्टक**' अशा विविध स्तोत्रांच्या रचना झाल्या.

शंकराचार्य जेथे जेथे गेले तेथील लोकांशी त्यांनी आपुलकीचे नाते जोडले. ज्ञान आणि भावना यांच्या माध्यमातून ते सभोवतालच्या परिसराशी ते एकरूप होत. म्हणूनच ते ज्या ठिकाणी गेले तेथील प्रमुख देवदेवतांवर त्यांनी स्तोत्ररचना केली. याचा परिणाम तेथील लोकांच्या मनावर त्यांना 'आपल्यातीलच एक' असे मानण्यात झाला.

काशीच्या परिसराशी असा परिचय करून घेतल्यानंतर ते तेथे स्थायिक झाले आणि व्याससूत्रे / ब्रह्मसूत्रांवरील आपल्या जगप्रसिद्ध भाष्याच्या रचनेला त्यांनी प्रारंभ केला. वादविवादातील अतुलनीय कौशल्य, प्रतिवाद करता येणार नाही

असे तर्कशुद्ध विचार, यामुळेच लोक आचार्यांकडे आकर्षिले जाऊ लागले. आचार्यांच्या दैनंदिन प्रवचनांना लोकांची उपस्थिती वाढू लागली. आचार्य ब्रह्मसूत्राच्या अर्थाचे कोडे उलगडून देऊ लागले. ही प्रवचने केवळ विद्वानांसाठीच नव्हती तर सामान्यजनांसाठीही होती. प्रवचनानंतर प्रश्नोत्तराचा कार्यक्रम होत असे. अशा प्रकारे ब्रह्मसूत्रभाष्याची सिद्धता होत गेली.

याच काळात आचार्यांना 'सनंदन' हा एक नवा शिष्य लाभला. हाच पुढे '**पद्मपादाचार्य**' म्हणून लोकप्रसिद्धीस पावला.

**चांडाळाची कथा :**

याच काळात घडलेला आचार्यांच्या जीवनातील एक अविस्मरणीय प्रसंग मोठा उल्लेखनीय आहे. त्याचे असे झाले....

एके दिवशी गंगेवर आपली दुपारची आन्हिके उरकून आचार्य आपल्या शिष्यांसह आश्रमाकडे परतत होते. अचानक एक चांडाळ आपल्या चार भयंकर कुत्र्यांसह त्यांना सामोरा आला. सोबत त्याची दोन मुलेही होती. अंगावर चिंध्या झालेले कपडे, डोक्यावर दारूचे मडके, असे त्याचे अमंगळ रूप पाहून आचार्यांचे शिष्य ओरडले, 'दूर हो! दूर हो!!'

यावर तो चांडाळ म्हणाला.....

**अन्नमयाद्अन्नमयं अथवा चैतन्यमेव चैतन्यात्।**
**द्विजवर दूरीकर्तुं वांछसि कीं ब्रूहि गच्छ गच्छेति।।**

'हे श्रेष्ठ ब्राह्मणा! कशापासून काय दूर करू इच्छितोस? एका अन्नमय कोशापासून दुसरा अन्नमय कोश? की एका चैतन्यमय कोशापासून दुसरा चैतन्यमय कोश! कारण मी देखील तुझ्यासारखाच ब्रह्मरूपच आहे.'

यावर आचार्यांनी समर्पक उत्तर दिले.....

'तू म्हणतोस ते सत्य आहे. तुला आत्मज्ञान झालेले आहे. अमका चांडाळ आहे, तमका अंत्यज आहे ही भेदबुद्धी मी सोडून देईन.'

हा चांडाळ साक्षात् शिवशंकराचेच रूप होते.

हा आचार्यांच्या जीवनातील एक संस्मरणीय प्रसंग. आचार्यांनी चांडाळाला दिलेले समर्पक उत्तर समजून घेण्यासारखे आहे. त्यातील सामाजिक तथ्य आकलन करण्यासारखे आहे. पूर्वी प्राचीन भारतात वर्णव्यवस्था होती; परंतु अस्पृश्यता नव्हती. शुद्रवर्णाचे लोक यज्ञकर्मातही भाग घेत असत. शूद्र हा अस्पृश्य होता असे संदर्भ कुठेही आढळून येत नाहीत. ह्या कथेच्या उपदेशाचे अनुसरण केले गेले असते तर आज समाजातील दोन गटांमध्ये जी प्रचंड दरी निर्माण झालेली

दिसते, ती झालीच नसती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना महाडचा सत्याग्रह करावाच लागला नसता; परंतु कालपुरूषाला ते मान्य नव्हते असे वाटते. आज मात्र या कथेपासून आपण निश्‍चितच अर्थबोध घेऊ शकतो.

कांची कामकोटी पीठाचे जगदगुरू स्वामी श्री जयेन्द्र सरस्वती यांनी आद्य शंकराचार्यांच्या शिकवणुकीचे पालन करण्याचे आवाहन केलेले आहे. हा मुद्दा येथे लक्षात घेण्यासारखा आहे.

आपल्या काशी येथील चार वर्षांच्या वास्तव्यात आचार्यांचे **'ब्रह्मसूत्रभाष्य'** पूर्ण झाले. उपनिषदांवरील भाष्याच्या रचनेला प्रारंभ झाला.

**'ब्रह्मसूत्रभाष्या' ची** रचना होत असतानाच त्यांना भगवान् वेदव्यासांचे दर्शन झाले. ब्रह्मसूत्राच्या व्याख्यानातील आचार्यांचे कौशल्य पाहून ते स्तिमीत झाले. आता आचार्यांचे वय अवघे सोळा वर्षांचे होते. वेदव्यासांनी ब्रह्मदेवाला विनंती करून ते आणखी सोळा वर्षे वाढवून दिले.

प्रस्थानत्रयीवरील भाष्यरचना पूर्ण झाल्यावर ते बदरीकाश्रमी गेले. तेथेच त्यांचे गुरू गोविंदयती देखील होते. आचार्यांची भाष्यरचना गोविंदयती तसेच गौडपादाचार्य दोघांनीही पाहिली. ते दोघेही मनोमन संतुष्ट झाले. त्यांनी आचार्यांना अद्वैतमताचा जगभर प्रसार आणि प्रचार करण्याचा आदेश दिला. आचार्यांना त्यांचे गुरू आणि परमगुरू या दोघांचे आशीर्वाद मिळाल्यामुळे ते कृतार्थ झाले. आनंदाच्या भरात त्यांनी **'धन्याष्टका' ची** रचना केली.

त्यानंतर त्यांनी कैलासाची यात्रा केली. तेथे त्यांना भगवान् शंकराचा साक्षात्कार झाला. आचार्यांनी त्याकडे अध्यात्मिक संन्यासाची मागणी केली. शिव शंकराने ती लगेच पूर्ण केली. त्या दिव्य अनुभवानंतर त्यांनी **'दक्षिणामूर्ती स्तोत्र'** रचले. तसेच सदाशिवाच्या दर्शनप्रसंगी **'शिवमानसपूजा'** ह्या स्तोत्राची रचना केली.

बदरीकाश्रमी असतानाच अलकनंदेच्या तीरावर आचार्यांनी बद्रीनारायणाची प्राणप्रतिष्ठा केली.

**मातृछत्र हरपले :**

आचार्य अद्वैतमताचा प्रसार आणि प्रचार सुरू करण्यासाठी काशीला परत निघाले होते. तोच कालटीहून आर्यम्बेचा निरोप घेऊन अग्निशर्मा आला. आईने त्यांना बोलाविले होते. त्याच वेळी गढवालच्या राजाने आचार्यांना काही सेवा सांगण्याची विनंती केली. आचार्यांनी त्यास बद्रीनाथाचे मंदिर बांधावयास सांगितले. अग्निशर्म्याबरोबर आईने सोन्याचांदीची भांडी पाठविली होती. ती आचार्यांनी

पूजेची उपकरणे म्हणून बद्रीनाथ मंदिरास दिली. अग्निशर्म्याकडे पूजेअर्चेची व्यवस्था सोपवून आचार्य विष्णुशर्म्याबरोबर कालटीस परतले.

आचार्यांनी आपल्या आईला भगवान् श्रीकृष्णाचा साक्षात्कार घडविला. **'साधनचतुष्टया' ची** रचनाही तेथेच झाली. परमेश्वराचा साक्षात्कार झाला. आर्यम्बेचे जीवन कृतार्थ झाले. लाडक्या शंकराला आशीर्वाद देऊन ती समाधीस्थ झाली. नंतर आचार्य अंत्यसंस्काराच्या तयारीला लागले; परंतु ब्राह्मणांनी आचार्यांना आपल्या मातेचा अंत्यसंस्कार करण्याला विरोध प्रदर्शित केला, कारण आचार्य हे संन्यासी होते. रूढी सोडावयास ब्राह्मण तयार नव्हते. आचार्यांनी आपल्या आईच्या मृतदेहाचे दहन घराच्या मागच्या अंगणात केले. मृतदेह ताठलेला होता, कारण मृत्यूनंतर पुष्कळ वेळ होऊन गेलेला होता. त्या मृतदेहाचे तीन तुकडे करून ते चितेवर ठेवावे लागले. अंत्यसंस्काराला एकही ब्राह्मण उपस्थित नव्हता. आचार्यांनीच योगसामर्थ्याने अग्नी निर्माण करून आपल्या मातेचा अंत्यसंस्कार केला.

ही घटना केरळ नरेशाच्या कानावर गेली. ते स्वतः कालटीस आले. त्यांनी आचार्यांची क्षमा मागितली. शिवाय सर्व प्रजाजनांनी आपल्या नातेवाईकांच्या मृतदेहाचे दहन घराच्या मागील बाजूस करण्याची आज्ञा केली. ही प्रथा केरळात आजही पाहायला मिळते. शिवाय मृतदेहावर तो तोडल्याच्या तीन प्रतिकात्मक खुणा केरळात तसेच देशाच्या अन्य भागातही केल्या जातात.

आचार्य काशीकडे निघाले!

वाटेतच त्यांना कळले की, गोविंदयती आजारी आहेत. आचार्यांनी लगेच ओंकारमांधाता गाठले. तेथे गोविंदयती शेवटच्या घटका मोजत होते. त्यांनी आपल्या शिष्यांना अखेरचा उपदेश केला. सर्वांना शंकराचार्यांना गुरूस्थानी मानावयास सांगितले आणि ते ब्रह्मस्वरूपात विलीन झाले. तो दिवस होता कार्तिक पौर्णिमा, युधिष्ठिर शके २६४६, इ.स.पू. ४९४.

आचार्यांना जगात दोनच बंधने होती. एक आई आणि दुसरे गुरू. दोन्ही बंधनातून आचार्य मुक्त झाले. प्रेमाचे दोन दुवे तुटले.

आचार्यांच्या जीवनचरित्राशी अनेक चमत्कार निगडित आहेत. यातच एक उदंकाची कथा आहे. आचार्य प्रयागक्षेत्री असताना अद्वैतमताच्या प्रसारार्थ प्रवचने करीत होते. तेव्हा गळफास लावून आत्महत्या करावयाच्या तयारीत असलेला एक तरूण कुष्ठ महारोगी त्यांना दिसला. आचार्यांनी त्यास आवाहन केले, 'थांब! थोडा वेळ थांब!!' तो तरूण थांबून आचार्यांकडे धावला. आचार्यांनी त्याच्या पाठीवरून हात फिरविला. त्याचे कुष्ठ नष्ट झाले आणि शरीर पुनः

पूर्ववत् झाले.

आचार्यांनी उदंकाला उपदेश दिला आणि त्यास **'अहं ब्रह्मास्मि'** हा साक्षात्कार घडविला व त्यास संन्यासदीक्षा दिली.

प्रभाकर हा पूर्वमीमांसेचे अनुसरण करणारा परंतु भाट्टमताला विरोधी मत मांडणारा एक प्रकांड पंडित होता. हाच 'बृहती' चा कर्ता. गंगेच्या पूर्व किनाऱ्यावरील प्रतिष्ठानपुरी येथे तो राहत असे. आचार्यांनी त्याचा वादात पराभव केला. हा आचार्यांचा मीमांसकांवरचा पहिला विजय ठरला.

प्रभाकराला एक पुत्र होता; परंतु तो होता मुक आणि बधीर. प्रभाकराच्या पत्नीने त्या मुलाला आचार्यांच्यासमोर आणले. मोठ्या मायेने त्याच्या डोक्यावर हात ठेवून आचार्यांनी विचारले,

**कस्त्वम् शिशो कस्त्य कुतोऽसि गन्तम्।**
**किं नाम ते त्वं कुत आगतोऽसि।।**

बाळ तू कोण ? कोणाचा मुलगा ? कुठे निघालास ? तुझे नाव काय ? कुठून आलास.... ? आणि चमत्कार असा की, त्या मुलाने बारा श्लोकांत उत्तरे दिली. आचार्यांनी त्या मुलाला विचारलेले प्रश्न **'हस्तामलक स्तोत्र'** म्हणून सुप्रसिद्ध आहे.

प्रयागहून आचार्य कौशांबीला आले. तेथे एका वृद्ध दाम्पत्याचा एकुलता एक मुलगा मरण पावल्याने होत असलेला आक्रोश त्यांच्या कानी आला. तेथील स्थानदेवता मुकांबिकेची 'आनंदलहरी' ह्या स्तोत्राने स्तुति करून आचार्यांनी त्या मृत मुलाला जिवंत केले.

काही चरित्रकारांच्या मते हा प्रसंग कर्नाटकातील गोकर्णक्षेत्री घडला.

शंकराचार्यांच्या समकालीन असलेला मीमांसक मताचे कट्टर पुरस्कर्ते आणि प्रकांड पंडित म्हणजे कुमारिलभट्ट. भट्टपाद अशा आदरार्थी संबोधनाने त्यांचा उल्लेख होतो. **'मीमांसा श्लोकवार्तिक', 'तंत्रवार्तिक'** आणि **'टुप् टीका'** हे त्यांचे ग्रंथ. बौद्धमताचे खंडण करून वैदिक कर्ममार्गाची पुनर्स्थापना करण्यात त्यांचा सिंहाचा वाटा आहे.

**आचार्य - मंडन वाद :**

आचार्य वादविवादासाठी कुमारिलभट्टांकडे आले. कुमारिल आपले शरीर अग्नीस अर्पण करण्याच्या तयारीत होते. कुमारिल भट्ट म्हणाले, 'माझे जीवनकार्य संपले. माझा मेहुणा मंडनमिश्र आहे, त्याच्याकडे तू जा. त्याला जिंकलेस तर सर्व मीमांसकांना जिंकल्यासारखे होईल.' मंडनमिश्र हे महिष्मती विद्यापीठाचे कुलपती

होते. आचार्य मंडनमिश्रांच्या भेटीस गेले.

पूज्यपाद आचार्य आणि मंडनमिश्र हे अनुक्रमे 'उत्तरमीमांसा' आणि 'पूर्वमीमांसा' ह्या दर्शनांचे महापंडित. ह्या पंडितप्रवरांच्या प्रदीर्घ वादाची वास्तविक नोंद दुर्दैवाने आपल्याला उपलब्ध नाही. 'कुतोमुंडी ? आगलान्!....' इत्यादी प्रश्नोत्तरांची जी नोंद आहे ती प्राथमिक शाब्दिक चकमक म्हटली तरी तीस गंभीर वादविवादाचे स्वरूप नाही.

**परकाया प्रवेश :**

ह्या वादात मंडनमिश्रांचा पराजय होऊ लागला तेव्हाच मंडनाची पत्नी भारती हिने आचार्यांना कामशास्त्रावरील काही प्रश्न विचारले. जोपर्यंत कामशास्त्राचे ज्ञान होत नाही तोपर्यंत आचार्य हे सर्वज्ञ गुरू होऊ शकत नाहीत, अशी तिची भूमिका होती.

आचार्यांनी सहा महिन्यांची मुदत मागितली.

परकायाप्रवेशाच्या सिद्धीचा उपयोग करून आचार्यांनी अमृतपूर नगरीच्या मृत राजाच्या शरीरात प्रवेश केला. तेथे त्यांनी काम ह्या पुरूषार्थाचा अनुभव घेतला. पुनः आपल्या शरीरात प्रवेश करून ते महिष्मती नगरीला भारतीच्या प्रश्नांची उत्तरे देऊन मंडनाशी चाललेल्या वादाची परिसमाप्ती करण्यासाठी आले.

मंडनमिश्रांचा पराजय झाला.

मंडनाने आचार्यांचे शिष्यत्व स्वीकारले. हेच सुरेश्वराचार्य होत. आचार्यांना सनातन भारतीय धर्म आणि संस्कृतीचे निर्विवाद नेतृत्व प्राप्त झाले.

भारतीनेही कालांतराने देहत्याग केला.

यानंतर आचार्य काश्मीरला आले व तेथे ते सर्वज्ञपीठावर आरूढ झाले. येथेच **'सौंदर्यलहरी' ची** रचनाही झाली.

**मठ स्थापना :**

द्वारकेचा राजा सुधन्वा याने आचार्यांना भेटीला बोलाविले. धर्मपीठ स्थापन करावे अशी इच्छाही त्याने बोलून दाखविली. आचार्यांनी राजाची विनंती मान्य केली. अद्वैतमताच्या प्रचार–प्रसाराचे कार्य अव्याहत चालू राहावे, हीच धर्मपीठाच्या निर्मितीमागची भूमिका होती. इ.स.पू. ४९१ मध्ये द्वारकामठाची स्थापना झाली.

द्वारकामठाची स्थापना केल्यानंतर सोमनाथ, उज्जैनी करीत आचार्य नेपाळला गेले. तेथून पुन्हा कैलास करून बद्रीनाथाला आले.

आचार्यांबरोबर गिरी नावाचा एक शिष्य असे. तो मतिमंद होता. आचार्यांच्या

प्रेरणेने त्यास दिव्य बुद्धि प्राप्त झाली आणि तो उत्कृष्ट रचनेस समर्थ झाला. त्याने रचलेले 'शंकरदेशिकाष्टक' सुप्रसिद्ध आहे. हा गिरी म्हणजेच तोटकाचार्य. ही घटना बद्रीनाथची!

बद्रीनाथ येथे आचार्यांनी इ.स.पू. ४८६ मध्ये मठ स्थापन केला. त्या मठाचे प्रमुख तोटकाचार्य होते.

आचार्य पुढे जगन्नाथाच्या दर्शनासाठी पुरीला आले व तेथे इ.स.पू. ४८५ मध्ये मठस्थापना करून तेथील सूत्रे पद्मपादाचार्यांकडे सोपविली.

श्रीशैल मल्लीकार्जुन क्षेत्री असताना आचार्यांच्या कापालीकांशी संघर्ष झाला. पद्मपादांच्या मदतीने ते कापालीकांच्या हल्ल्यातून बचावले.

श्रीशैलम्नंतर महाराष्ट्रातील त्र्यंबकेश्वर, नाशिक, भीमाशंकर करीत ज्योतीर्लिंगाचे दर्शन घेत आचार्य पंढरपूरला आले. तेथून हरीहर येथे आणि पुढे तुंगभद्रेच्या तिरावर शृंगेरी येथे येऊन इ.स.पू. ४८४ मध्ये मठस्थापना केली. हस्तामलकाला येथील आचार्यपद देण्यात आले. आचार्य येथे बारा वर्षे राहिले. अर्थात् हा काळ वादग्रस्त आहे.

कुडाळी शृंगेरीहून परत कालडी वृषाचल करून आचार्य तिरूवअनंतपुरम् येथे आले. तेथे त्यांनी 'अनंतशयनम्' – श्री पद्मनाभन् स्वामी क्षेत्राचे दर्शन घेतले व पुढे ते कन्याकुमारी करून तिरूचिरापल्लीला गेले. तिरूचिरापल्लीला त्यांनी सुगंधिकुन्तलाम्बिकेचे दर्शन घेतले आणि तेथून ते रामेश्वरला गेले.

**महाप्रस्थान :**

पुढे आचार्य कांचीपूरम् येथे आले. तेथे त्यांनी इ.स.पू. ४८२ मध्ये तेथील मठाची स्थापना केली. आता त्यांनी आपले वास्तव्य तेथेच केले. कामाक्षीअम्मन्च्या मंदिरात त्यांनी श्रीचक्राची स्थापना केली आणि तेथे ते रोज पूजाअर्चा करीत असत. मदुराई येथील मिनाक्षी मंदिरातही श्रीचक्राची स्थापना केली. तिरूपतीला धनाकर्षण यंत्राची स्थापना केली. तेथून ते चिदंबरम् करून मध्यार्जुनास महालींगेश्वराच्या दर्शनास गेले. मदुराईच्या मिनाक्षी सुंदरेश्वराचे दर्शन करून आचार्य कांचीस परत आले.

कांचीला आचार्यांनी एक शिष्य परिषद भरविली. ह्या शिष्य परिषदेत आचार्यांनी आपला अंतिम संदेश दिला. अद्वैताची भूमिका भारतीयांच्या जनमानसात रूजावी हाच त्यांचा प्रमुख उद्देश होता.

ह्या शिष्य परिषदेनंतर हा अद्वितीय कर्मयोगी संन्यासी ब्रह्मस्वरूपात विलीन झाला.

**आचार्यांचा काळ :**

आचार्यांचा काळ हा इ.स. ७८८ ते इ.स. ८१० असा २९ वर्षांचा असल्याची इतिहासकारांची प्रचलित मान्यता आहे. आचार्यांचा हा काळ अनैतिहासिक असून अपुऱ्या पुराव्यांवर आधारलेला आहे.

आचार्यांवरील संस्कृत ग्रंथांची संख्या कांची कामकोटी पीठाने संकलित केलेल्या यादीनुसार ३१ आहे. याशिवाय टी. एस. नारायणशास्त्री, कोटा वेंकटाचलम्, इतिहासभूषण डॉ. श्रीपाद द. कुलकर्णी यांचे इंग्रजी ग्रंथ असे पूज्यपाद आचार्यांचे जीवन आणि कार्य यांचा आढावा घेणारे अनेक ग्रंथ आता उपलब्ध आहेत.

**प्रचलित मान्यतांचे आधार :**

आचार्यांच्या कालनिर्णयाविषयीच्या प्रचलित मान्यतांचे आधार खालीलप्रमाणे मांडता येतील.

१. बृहत्तर भारतातील कंबोडिया शिलालेखात शिवसोम हा भगवान् शंकराचा शिष्य असल्याची नोंद आहे. हा शिवसोम इन्द्रवर्मनचा गुरू होता. इन्द्रवर्मनचा काळ इ.स. ८७८ ते इ.स. ८८७ असा आहे. हा इन्द्रवर्मन इ.स. ८०२ ते इ.स. ८०९ या काळात होऊन गेलेल्या जयवर्मनचा नातू होता. ह्या पुराव्यावरून आचार्यांचा काळ इ.स. ७८८ ते ८२२ असा ठरविला जातो.

२. सौंदर्यलहरीच्या ७५ व्या श्लोकात 'तिरूज्ञानसम्बधा' चा उल्लेख आहे. त्या स्थळी द्रविडशिशूचा उल्लेख आहे. ज्ञानसम्बधाचा काळ इ.स. सातवे शतक मानला जातो. हे लक्षात घेता आचार्यांचा काळ आठव्या शतकाचा उत्तरार्ध मानला जातो.

३. कीथच्या मतानुसार कुमारिलभट्टाचा काळच इसवीसनाच्या सातव्या शतकामागे जाऊ शकत नसल्यामुळे आचार्यांचा काळ इ.स. आठवे शतक गृहित धरावे लागते.

४. पद्मपादाचार्यांच्या पंचपादीकेत महायान बौद्ध पंथाचा उल्लेख आहे. बौद्ध पंथातील महायान पंथ हा बराच उत्तरकालीन विकास आहे.

५. आचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्यात पाशुपतमताचे खंडण येते. पाशुपतमताचा विकास इसवीसनाच्या चौथ्या शतकानंतरचा आहे.

६. आचार्यांनी असंग, दिग्नाग, धर्मकीर्ति इत्यादी बौद्ध पंडितांच्या प्रतिपादनाचे खंडन केलेले आहे. हे बौद्धाचार्य इसवीसनाच्या तिसऱ्या शतकातील आहेत.

७. आचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्यात कमलशिलाच्या पंजिकेतील एक उद्धरण आहे. कमलशिलाचा काळ बराच नंतरचा आहे.

८. श्रृंगेरी परंपरेच्या एका शाखेची मान्यता असलेली आचार्यांच्या कालनिर्णयाशी संबंधित एक नोंद अशी....

**दुष्टाचार विनाशाय प्रादुर्भूतो महीतले।**
**स एव शंकराचार्यः साक्षात्कैवल्यनायकः।।**
**निधिनागेवह्नयब्दे विभवे शंकरोदयः।**
**कल्यब्दे चंद्र नेत्रांक वह्नि अब्दे चाविशद्गुहाम्।।**
**वैशाख पुर्णिमायां तु शङ्करः शिवतामगात्।।**

ब्रह्मांडाचा नायकच अशा शंकराचार्यांचा जन्म दुष्टाचार विनाशासाठी कोणत्या काळी झाला ते सांकेतिक पद्धतीने सांगितलेले आहे....

निधी (९), नाग (८), इभ (८), अग्नि (३) म्हणजे ९८८३ 'अंकांना वामतो गती' या न्यायाने ३८८९ कलीवर्ष म्हणजेच इ.स. ७८८ हे जन्मवर्ष येथे. तर चंद्र (१), नेत्र (२), अंक (९), अग्नि (३) अर्थात १२९३ म्हणजेच ३९२१ कलीवर्ष इ.स. ८२० हे विदेहमुक्तीचे वर्ष येते. सदानंदाच्या शंकर – दिग्विजय – सारात हाच काळ दिलेला आहे.

ही वर्षे पाश्चात्य पंडितांनी तसेच भारतीय इतिहासकारांनी निर्णायक म्हणून मान्य केलेली आहेत. हा कालनिर्णय मठांच्या परंपरांच्या विरोधाात जाणारा आहे. यासाठी वस्तुस्थिती तपासून पाहणे आवश्यक आहे.

**पारंपारिक कालनिर्णयाचे आधार :**

वरील कालनिर्णयाच्या विरोधात जाणारे काही महत्त्वाचे पुरावे असे सांगता येतील.

१. द्वारका, पुरी आणि कांची कामकोटी मठाच्या परंपरेने मान्य केलेल्या आचार्यांचा जन्मकाळ दर्शविणारा **'प्राचीन – शंकर – विजय'** ह्या ग्रंथातील उतारा असा....

**तिष्ये प्रत्यानलशेवधिबाण नेत्रे**
**यो नन्दने दिनमणावुदगध्वभाजि।**
**राधेऽ दितेरूडुनि निर्गतमङ्गलग्नेऽ**
**प्याहूतवान् शिवगुरूः स च शंकरेति।।**

श्लोकातील संकेताची उकल केल्यास.... अनल (३) शेवधि (९), बाण (५), नेत्र (२) 'अंकाना वामतोगती' ह्या न्यायाने २५९३ कलीवर्ष अर्थात् इ.स.पू. ५०९ हे आचार्यांचे जन्मवर्ष येते. यावरून आचार्यांचा जीवनकाल इ.स.पू. ५०९ ते इ.स.पू. ४७७ येतो.

२. द्वारकामठाच्या आचार्यांनी लिहिलेल्या ‘विमर्श’ नामक ग्रंथात एका ताम्रपटाचा उल्लेख आहे. हा ताम्रपट सुधन्वा राजाने आचार्यांना उद्देशून लिहिल्याचा उल्लेख आहे. ह्या ताम्रपटावर अश्विन शुक्ल १५, युधिष्ठिर शके २६६३, अशी तारीख नोंदविलेली आहे. हा काळ इ.स.पू. ४७७ ते इ.स.पू. ४७८ येतो.

३. द्वारका आणि गोवर्धनमठाच्या परंपरा परस्परांशी जुळणाऱ्या आहेत.

४. शृंगेरी मठाच्याच एका परंपरेत आचार्यांचा काळ इ.स.पू. ४४ असा दिलेला आहे. हा काळ त्यांनी मान्य केलेल्या इ.स. ७८८ च्या विरोधात जाणारा आहे.

५. किथने मान्य केलेला कुमारिलभट्टाचा काळ इसवीसन सातवे शतक हा चुकीचा आहे. कुमारिलाचा काळ जैन ग्रंथांनुसार इ.स.पू. ५५७ येतो. तसेच **‘जीनविजय’** ग्रंथात आचार्यांचा निर्वाण काळ इ.स.पू. ४७७ मान्य करण्यात आलेला आहे.

६. **‘पुण्यश्लोकमंजिरी’** ह्या सर्वज्ञ सदाशिव बोध (कांची कामकोटी पीठाचे ५४ वे आचार्य) यांनी लिहिलेल्या ग्रंथात आचार्यांचा काळ इ.स.पू. ५०९ ते इ.स.पू. ४७७ हाच मान्य केलेला आहे.

७. विजयवाड्याचे पंडित कोटा वेंकटाचलम् यांनी नेपाळ राजवंशावळी तसेच अन्य साधनांवरून आचार्यांचा जन्मकाळ इ.स.पू. ५०९ मान्य केलेला आहे. कोटा वेंकटाचलम् यांनी केलेली कालगणना कांची कामकोटी मठाच्या परंपरेशी मिळतीजुळती आहे.

८. चित्सुखाचार्यांच्या बृहत् शांकर विजयानुसार आचार्यांचा काळ इ.स.पू. ५०९ ते इ.स.पू. ४७७ हाच येतो.

९. गौडपादाचार्यांच्या भाष्यासह ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिकांचे चिनी भाषांतर इ.स. ५७० च्या आसपास झालेले आहे. हे भाषांतर गौडपादांच्यानंतर झालेले असणार म्हणजे गौडपाद इसवीसनाच्या सहाव्या शतकाच्या पूर्वीचे असणार. आचार्य हे आठव्या शतकातले मानले तर गौडपाद हे आचार्यांचे आजेगुरू ही संगती लागत नाही.

अशा विविध पुराव्यांवरून हेच सिद्ध होते की, आचार्यांचा काळ इ.स. ७८८ ते इ.स. ८२० मानण्याची प्रचलित मान्यता अनैतिहासिक आणि उपलब्ध पुराव्यांच्या विरोधात जाणारी असून आद्य शंकराचार्यांचा काळ द्वारका, पुरी आणि कांची कामकोटी यांच्या परंपरांनी मान्य केल्याप्रमाणे व वर दर्शविलेल्या वाङ्मयीन पुराव्यांनुसार इ.स.पू. ५०९ ते इ.स.पू. ४७७ हाच निर्णायकपणे

सिद्ध होतो. याविषयीचे सविस्तर प्रतिपादन डॉ. श्रीपाद द. कुळकर्णी यांच्या 'आदि शंकरा' या इंग्रजी ग्रंथात देण्यात आले आहे.

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचा काळ वादग्रस्त असला तरी पारंपारिक कालनिर्णय पूर्णपणे रद्दबातल ठरविता येत नाही. तथापि निर्णायक संशोधन आवश्यक आहे.

**शांकरवेदान्ताची दार्शनिक भूमिका :**

पूज्यपाद आचार्यांचे ग्रंथ नीट समजून येण्यासाठी शांकरवेदान्ताच्या मूलभूत भूमिकेचा परिचय असणे अत्यंत आवश्यक आहे. आचार्यांची तत्त्वज्ञानविषयक भूमिका गीता, ब्रह्मसूत्र आणि उपनिषदे अर्थात प्रस्थानत्रयीवरील त्यांच्या भाष्यातून स्पष्ट होते. आचार्यांच्या दार्शनिक भूमिकेतील महत्त्वाचे मुद्दे असे....

१. अनुभवास येणाऱ्या जडचेतन चराचर जगताचे उपादानकारण तसेच निमित्तकारण 'ब्रह्म' हेच आहे.

२. परा प्रकृति (जीव) आणि अपरा प्रकृति (जडतत्त्व) ह्या परमेश्वराच्या परब्रह्माच्याच आपल्या शक्ती आहेत. तथापि 'परब्रह्म' हे आपल्या परा व अपरा प्रकृतींपासून सर्वथा वेगळे, विलक्षण आणि उत्तम आहे. ह्या दोन प्रकृतींच्या सहाय्यानेच परब्रह्म हे सृष्टीकाळी जगताचा सर्ग करते व प्रलयकाळी त्याचा लय करते.

३. परब्रह्म परमात्मा निर्गुण, निराकार, निर्विशेष आहे.

४. परब्रह्म परमात्मा परमेश्वरच सृष्टीचा नियन्ता असून जीवांच्या कर्मफळाची व्यवस्था लावणारा स्वामी आहे.

५. जीव नित्य आहे. जन्म - मृत्यू हे औपचारिक आहेत. जन्म आणि मृत्यू ह्या केवळ शरीराच्या संदर्भातील घटना आहेत.

६. वैदिक धर्म प्रवृत्तिमार्ग आणि निवृत्तिमार्ग असा दोन प्रकारचा आहे.

७. दक्षिणायन मार्गाने जाणारा कर्ममार्गी मृत्यूनंतर कर्मफळाचे भोग प्राप्त करून झाले की पुनः जन्मास येतो.

८. उत्तरायण - देवयान मार्गाने जाणारा ज्ञानमार्गी परब्रह्म परमात्म्याच्या परमधामास प्राप्त होतो. तो पुनः जन्मास येत नाही. सायुज्यमुक्तीचा लाभ घेतो.

९. साधकाने निष्कामभावाने केलेली श्रौत-स्मार्त कर्मे चित्तशुद्धीस सहाय्यक ठरतात आणि साधकात ज्ञानयोगाच्या साधनेची पात्रता निर्माण करतात.

१०. ज्ञाननिष्ठा व कर्मनिष्ठा अगदी भिन्न असून एकाच पुरूषाकडून त्याचे अनुष्ठान होणे अशक्य असल्यामुळे ज्ञान-कर्म समुच्चय असंभव आहे. तात्पर्य, सर्वकर्मसंन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेच्या आचरणाने प्राप्त होऊ शकणाऱ्या सम्यक्ज्ञानानेच

मोक्ष प्राप्त होतो.

११. 'देह हाच आत्मा' असे मानणारे अज्ञानीजन आत्मा हाच कर्ता – भोक्ता असल्याचे मानतात हेच अज्ञान. हे अज्ञान सम्यक्ज्ञानाने नाश पावते.

१२. सर्व कर्मकर्तृत्व प्रकृतीचे आहे. मी 'क्षेत्रज्ञ' त्यापासून वेगळा आहे, हे जाणणे हाच विवेक, हेच ज्ञान.

१३. सम्यक्दर्शनानेच मुक्ती प्राप्त होते.

१४. आत्मज्ञान हे स्वतः सिद्ध असल्यामुळे त्यासाठी प्रमाणाची आवश्यकता नाही.

१५. शास्त्र आणि परंपरा हीच प्रमाण मानली पाहिजे.

१६. प्रत्यक्षानुभव आणि बुद्धिनिष्ठ तर्क ह्यांना विरोधी असा श्रुतीचा व शास्त्राचा अर्थ लावू नये.

१७. सर्व आश्रमवासीयांचा ब्रह्मविद्येत अधिकार आहे. संन्यास घेण्यासाठी ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ अशा क्रमाने जाण्याची गरज नाही.

१८. सम्यक्दर्शन झालेला जीवन्मुक्त ज्ञानी लोकसंग्रहार्थ कर्मे करू शकतो. अशा कर्मांचा त्यास लेप होत नाही.

१९. आत्मसंयमार्थ योगमार्गाची साधना आवश्यक आहे.

२०. पराभक्तीच्या योगाने परमेश्वराशी एकत्व पावलेला सम्यक्दर्शीच होय.

आचार्यांनी परब्रह्म, परमात्मा, परमेश्वर, पुरुष हे शब्द समानार्थक मानले आहेत. श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रात हीच भूमिका सारांशरूपाने मांडण्यात आली आहे.

**श्री सुरेश्वराचार्य आणि त्यांचे कार्य**

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचे सुरेश्वराचार्य, पद्मपादाचार्य, हस्तामलकाचार्य व तोटकाचार्य असे चार प्रमुख शिष्य परंपरा मानते. त्याशिवाय चित्सुखाचार्य, सर्वज्ञ, श्रीचरण, विश्वरूप हे देखील त्यांच्या शिष्यगणात होते. पूज्यपादांचा शिष्य परिवार मोठा असला पाहिजे. त्या सर्वांची नांवे व कार्य अज्ञात आहे. आचार्यांच्या प्रमुख चार शिष्यांची नियुक्ती त्यांनी स्वतः स्थापन केलेल्या चार मठांचे अधिकारी म्हणून केली. ते स्वतः कांची कामकोटी मठात राहीले. याप्रमाणे श्रृंगेरी, द्वारका, पुरी, ज्योतिर्मठ व कांची मठ असे पाच मूळ मठ आहेत. साधारणपणे पूज्यपाद आद्य शंकराचार्यांनी केलेल्या नियुक्तीनुसार ज्योतिर्मठावर तोटकाचार्य, द्वारकापीठावर पद्मपादाचार्य, गोवर्धनमठ (पुरी) येथे हस्तामलकाचार्य, श्रृंगेरीस पृथ्वीधराचार्य व कांची कामकोटीस सुरेश्वराचार्य अशा नेमणुका दिल्या

असाव्या. या ऐवजी द्वारकापीठावर चित्सुखाचार्य, पुरीस पद्मपादाचार्य व श्रृंगेरीस सुरेश्वराचार्य असावे असेही कांही मठाम्नाय परंपरांवरून दिसते. मठाम्नाय परंपरा वादग्रस्त आहेत. प्रस्तुत 'मानसोल्लास' ग्रंथाचे लेखक वार्तिककार श्रीसुरेश्वराचार्य असल्याचे प्रसिद्ध आहे. त्यांचे नांव श्रृंगेरी, कांची कामकोटी अशा दोन्ही परंपरात आहे. श्रृंगेरी व कांची यात परस्पर वाद आहेत. असो. येथिल विवेचन सुरेश्वराचार्यांच्या इतिहासापुरते मर्यादित ठेवले आहे.

पूज्यपाद आचार्यांनी प्रस्थानत्रयीवर भाष्यरचना केल्यानंतर त्यावर वार्तिके लिहीण्याचा आदेश सुरेश्वराचार्यांना दिला. त्यांनी लिहीलेल्या वार्तिकात तैत्तिरीय उपनिषद् भाष्य वार्तिक, बृहदारण्यक उपनिषद् भाष्य वार्तिक, श्री दक्षिणामूर्ति स्तोत्र वार्तिक 'मानसोल्लास' तसेच पंचिकरण वार्तिक प्रसिद्ध आहे. नैष्कर्म्यसिद्धी हा ग्रंथही सुरेश्वराचार्यांचाच आहे. बृहदारण्यक उपनिषदावरील वार्तिकाचा विस्तार सुमारे १२००० श्लोकांचा आहे. मानसोल्लासात ३५५ श्लोक आहेत तर पंचिकरण वार्तिकात ६४ श्लोक आहेत.

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचा भट्टपाद कुमारिलांचे शिष्य मंडनमिश्र यांचेशी त्यांची सहधर्मचारिणी सरस्वतीच्या साक्षीने झालेला वाद प्रसिद्ध आहे. या वादात आचार्यांनी अद्वैतमत प्रस्थापित केल्यामुळे मंडनमिश्र हे आचार्यांचे शिष्य झाले. त्यांनी अद्वैतमत स्वीकारून संन्यास घेतला. हेच श्री सुरेश्वराचार्य होत, या संदर्भात टी.एस. नारायणशास्त्री लिहीतात–

"According to all reliable authorities Sureshwara was no other than Mandan Mishra the famous disciple of Kumarila Bhatta and when Shankara met him in to a Sanyasin, he was already pretty advanced in age and was undoubtedly much older than Sankara himself" (P. 8)

श्री सुरेश्वराचार्य अर्थात् पूर्वीचे श्रीमंडनमिश्र हे यांचा जन्म नर्मदेच्या उत्तरेकडील माहिष्मती नगरीत झाला. आजही तेथे मंडनेश्वर महादेवाचे मंदिर आहे. आचार्यांचा जीवनकाल अवघा ३२ वर्षांचा इ.स.पू. ५०९ ते इ.स.पू. ५४० असा परंपरेनुसार मानावयाचा झाल्यास सुरेश्वराचार्यांचा म्हणजे मंडनमिश्रांचा जन्म इ.स.पू. ५०९ पूर्वीचा मानावा लागतो. आचार्यांचे बालपण, वेदाध्ययन, उपनयन संन्यास, गोविंदपादांकडे शिक्षण, व्यासदर्शन व भाष्यरचना यानंतर आचार्य–मंडन वाद झाला असला पाहिजे. या वेळी आचार्य २४ वर्षाचे तरी असावे. हे लक्षात घेता इ.स.पू. ५०९ नंतर २४ वर्षे म्हणजे इ.स.पू. ४८५ या वर्षी कदाचित् हा वाद झाला असावा. या वेळी मंडनमिश्र विवाहीत होते ते ४०–५० वर्षाचे असणे

शक्य आहे हे गृहीत धरता मंडनमिश्रांचा जन्म इ.स.पू. ५३५ चा असावा असा अंदाज करता येतो. त्यांचे आयुष्य ८० वर्षाचे गृहीत धरले तर त्यांचा निर्वाणकाळ हा इ.स.पू. ४५५ येतो. हे अंदाज वास्तवाहून फारसे दूर नसावे.

श्रीसुरेश्वराचार्य हे श्रृंगेरी परंपरेचे की कांची कामकोटी परंपरेचे याबाबत वाद आहे. श्रृंगेरी मठाम्नायातील उल्लेख असा– (श्लोक १७,१८)

**आचार्य तत्र चैतन्यब्रह्मचारीति विश्रुतः ।**
**वार्तिकादि ब्रह्मविद्याकर्ता यो मुनिपूजितः ।।**
**सुरेश्वराचार्य इति साक्षात् ब्रह्माव तारकः ।**

वार्तिकाकार श्री सुरेश्वराचार्य श्रृंगेरीमठाचे आचार्य होते यात शंका नाही. तथापि श्रृंगेरी परंपरेनुसार ते सुमारे ७८५ ते ८०० वर्षे मठाधीश होते. हे आयुर्मान न पटणारे आहे. या विषयी पंडित एन. भाष्याचार्य म्हणतात,– "This may be a mistake for 80 years" (पृ. १३) हे मान्य करता येण्यासारखे आहे परंतु एन. भाष्याचार्यांच्या मते आचार्यांचा काळ इ.स. सातवे शतक आहे तो मात्र स्वीकारता येत नाही कारण सर्व मठांच्या आचार्यपरंपरा या काळाच्या विरोधात जातात.

श्रृंगेरीमठाचे आद्य शंकराचार्यांनंतरचे आचार्य श्री सुरेश्वराचार्य नसून पृथ्वीधराचार्य अथवा पृथ्वीधवाचार्य होते असेही मत प्रचलीत आहे. हे पृथ्वीधराचार्य कोण होते ? याविषयी मतमतांतरे आहेत.

श्री सुरेश्वराचार्य हे द्वारकामठावर होते असाही एक उल्लेख आहे. द्वारकामठातील गुरू–वंशावलीत हा उल्लेख येतो. त्यानुसार –

**युधिष्ठिर शके २६३१ वैशाख शुक्ल पञ्चम्यां श्रीमच्छङ्करावतारः। २६३६ चैत्र शुक्ल नवम्यां उपनयनम्। २६३९ कार्तिक शुक्ल एकादश्यां चतुर्थाश्रम स्वीकारः। २६४० फाल्गुन शुक्ल द्वितीयायां श्रीमद् गोविन्द भगवत् पूज्यपादाचार्याणां सकाशादुपदेशः। २६४९ चैत्र शुक्ल नवम्यां श्री मण्डनमिश्राणां उत्तमाश्रमदिक्षा सुरेश्वराचार्य इति योगपट्टश्च। २६४९ माघ शुक्ल सप्तम्यां श्रीमद् सुरेश्वराचार्याणां द्वारवत्यां शारदापीठेऽभिषेचनम्।**

या वादविवादाविषयी आपले मत मांडत टी.एस. नारायणशास्त्री लिहीतात– (पृ. १३)

"The fact is that each of these mutts in Southern India wished to secure by hook or crook, the name of Sureshwaracharya, the greatest of the disciples of Shri Shankara Bhagvat pada to be included in the list of its acharyas where as, in fact, Sureshwaracharya himself, though he was originally appointed by the Guru as the first

Acharya of the Dwarka mutt..."

सुरेश्वराचार्यांचे बंधू विश्वरूपाचार्यांना द्वारकापीठाचे आचार्यपद मिळावे यासाठी त्यांनी आचार्यांना विनंती करून आपल्या जागी त्यांची ब्रह्मस्वरूपाचार्य या नांवाने नियुक्ती केली, असेही नारायणशास्त्री म्हणतात. या संदर्भात त्यांनी राजा सुधन्वाच्या ताम्रपटाचा पुरावा उद्‌धृत केला आहे. असो.

श्री सुरेश्वराचार्यांचा काळ तसेच त्यांचा द्वारका, श्रृंगेरी, कांची यापैकी कोणत्या मठाशी संबंध होता हे मुद्दे वादग्रस्त असले तरी त्यामुळे सुरेश्वराचार्यांच्या कार्याचे महत्त्व कमी होत नाही. याविषयी महामंडलेश्वर श्री महेशानन्दगिरी म्हणतात–

"After his conversion as Sureshwara he was appointed as the organizer of the Southern movement of Advaita with Shringagiri as its headquarters. He was also in that capacity associated with the planning of Kanchi Puram as the city of Shri Vidya" (प्रस्ता. पृ.३)

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांच्या दक्षिण प्रसारकार्याचे ते प्रमुख होते. ते कांची कामकोटीपिठाशी देखील संबंधीत होते. या दक्षिणेतील कार्यासाठीच त्यांनी द्वारकेतून निवृत्ती घेतली असावी असे म्हणणे निश्चितच तर्कविसंगत ठरत नाही.

पूर्वाश्रमीचे मंडनमिश्र व भट्टपाद कुमारिलांचे शिष्य या नात्याने त्यांचा पूर्वमीमांसा शास्त्रावरील अधिकार मोठा होता तर उत्तराश्रमीचे श्री सुरेश्वराचार्य पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचे शिष्य या नात्याने उत्तर मीमांसादर्शनावरील त्यांचा अधिकार अप्रतिहत होता. कर्म आणि ज्ञानाचा सुरेख संगम त्यांच्या ग्रंथ विवेचनात पहावयास मिळतो. खरेतर आचार्यांच्या भाष्य ग्रंथांचे अध्ययन वार्तिकांच्या प्रकाशातच व्हावयास हवे.

**मानसोल्लासातील विषय :**

आपल्या 'मानसोल्लास' या श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रावरील वार्तिकात त्यांनी चार्वाक, वैशेषिक–न्याय, बौद्ध अशा सर्वच मतांचा परामर्श घेतला असून योगसाधनापद्धतीचेही निरूपण केले आहे. शांकर वेदान्ताची भूमिका प्रत्यभिज्ञेच्या परिभाषेत मांडलेली असून हा ग्रंथ म्हणजे शांकर–वेदान्ताचे उत्कृष्ट मार्गदर्शक आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्र वार्तिकात म्हणजेच 'मानसोल्लास' नामक या ग्रंथात भारतीय दर्शनशास्त्रातील सर्वच दर्शनांचा परामर्श संक्षेपाने तरिही चिकित्सक भूमिकेतून घेण्यात आला आहे. वैदिक समजल्या जाणाऱ्या सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, पूर्व मीमांसा या पाच दर्शनांशिवाय अवैदिक समजल्या जाणाऱ्या बौद्ध, जैन व चार्वाक या तीन दर्शनांचा म्हणजे एकूण आठ दर्शनांची मांडणी पूर्वपक्ष

म्हणून करीत त्यावर उत्तरपक्षाची मांडणी शांकर–वेदान्ताच्या श्रुतीसंमत बाजूने करण्यात आली आहे. हा पूर्वपक्ष–उत्तरपक्ष नीट समजून येण्यासाठी तसे पाहीले तर भारतीय दर्शनपरंपरेतील सिद्धांतांचा किमान परिचय असणे आवश्यक आहे.

या सर्व दर्शनांचा स्थूल परिचय देणे देखील पूर्वपिठीका मांडण्याच्या मर्यादेत खरेतर शक्य नाही. तथापि भारतीय दर्शनशास्त्राचा परिचय नसलेल्या वाचकाच्या हाती हे ग्रंथ पडलाच तर त्याला पार्श्वभूमी समजून यावी यासाठी येथे 'मानसोल्लास' वार्तिकातील संदर्भांसह दर्शनांची संक्षिप्त भूमिका येथे दिली आहे.

**मानसोल्लासातील चार्वाक–दर्शन**

भारतीय दर्शनशास्त्रातील अगदी 'हार्ड कोअर' कट्टर वेदविरोधी, निरीश्वरवादी, इहलोकवादी, देहात्मवादी व नास्तिक समजले जाणारे असे हे दर्शन प्राचीन काळापासूनच वादग्रस्त ठरले आहे. प्रचलीत मान्यतांनुसार या दर्शनाला इतर सर्वच–वैदिक तसेच अवैदिक–दर्शनांचा विरोध आहे असे नाही, तर अनेकांनी त्याची हेटाळणी देखील केली आहे.

चार्वाक–दर्शनच, लोकायत व बार्हस्पत्य या नावांनिही ओळखले जाते. देवगुरू बृहस्पती हा या दर्शनाचा प्रवर्तक असल्यामुळे त्याचे नांव '**बार्हस्पत्य**'; ते जन सामान्यात प्रचलीत असल्यामुळे '**लोकेषु आयत**' या व्युत्पत्तीनुसार लोकायत; आणि चर्वण करणारा भोगवादी म्हणून, चांगली वाणी बोलणारा चारू–वाक् म्हणून वा 'चार्वी' म्हणजे बुद्धीवादी सिद्धांत प्रतिपादन करणारे दर्शन म्हणून '**चार्वाक**' अशी ही नांवे आहेत.

विविध सैद्धांतिक मुद्यांवर केली जाणारी या दर्शनाची उपेक्षा कितपत बुद्धीवादी आहे ? या दर्शनाच्या तत्त्वांचा स्वीकार वैदिक विचार आणि आचार यात प्रच्छन्नपणे कसा झाला आहे ? हे दर्शन बृहस्पतीचे असूनही अवैदिक का ? किंबहूना वैदिक–अवैदिक असा भेद तर खरा आहे का ? चार्वाकाला '**ऋणंकृत्वा धृतं पिबेत्**' हा विचार सांगावयास लावूनही '**सर्व प्राणिनाम् अनुग्रहार्थं**' हे दर्शन ते कल्याणकारी का म्हणतात ? या व अशा सर्व प्रश्नांची चर्चाही येथे करणे शक्य नाही.

या दर्शनाविषयीचे कोणतेही निष्कर्ष मांडणे हे साहसाचेच ठरते, कारण या विचारधारेचे कोणतेही मूळ सूत्र ग्रंथ, भाष्ये वा वार्तिके आजमितीस उपलब्ध नाहीत.

तथापि असे ग्रंथ निश्चितच असले पाहीजेत. कारण असे बरेच संदर्भ याविषयीच्या विरोधकांच्या ग्रंथातील पूर्वपक्षमांडणीवरून प्राप्त होतात. असो.

**देहात्मवादी चार्वाक :**

चार्वाकदर्शनाच्या विविध विचारधारांपैकी 'देहात्मवाद-देह हाच आत्मा आहे' असे मांडणारी या दर्शनाची एक शाखा निश्चितच अस्तित्वात होती. या विचारधारेचा उल्लेख सदानंदाच्या **'वेदान्तसार'** ग्रंथात (खण्ड. १९) आहे. तैत्तिरीय उपनिषदातील **'अन्नमयआत्मा'** (तै.उ. २.१)ही संकल्पना या विचाराशी जुळणारी आहे. शिवाय छान्दोग्य उपनिषदात या स्थळी देवराज इन्द्र व असुराधिपती विरोचन यांना प्रजापतीने उपदेशिलेल्या तत्त्वज्ञानाचा हा पहिला टप्पा देखील आहे.

चार्वाक-दर्शनाच्या देहात्मवादी विचारधारेचा उल्लेख पू. सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लासात उल्लास ५ श्लोक १ ते ५ १/२ या स्थळी करण्यात आली असून त्याचे खंडन याच उल्लासात श्लोक ८१/२ ते १३ १/२ पर्यंत मूळ स्तोत्राच्या श्लोक ५ वरील वार्तिकात करण्यात आले आहे.

**प्राणात्मवादी चार्वाक :**

प्राणतत्त्व हेच अंतिम सत् आहे असे मानणारी चार्वाकदर्शनाची एक विचारधारा असल्याचे सदानंदाने आपल्या वेदान्तसारात (खण्ड. १९) नोंदविले आहे. ही विचारधारा तैत्तिरीय उपनिषदातील **'प्राणमय आत्मा'** (तै.उ. २.२) या संकल्पनेचा आधार घेत असल्याचेही सदानंद सांगतो. बृहदारण्यक उपनिषदातील गार्ग्य-बालाकी व राजा-अजातशत्रू यांच्या संवादात (बृ.उ. २.३) प्राणात्मवादी-प्राणब्रह्मवादी विचाराचा उल्लेख आहे. उपनिषदात इतरत्रही अशा नोंदी आहेत. तथापि त्या निष्कर्ष रूप नाहीत.

चार्वाकदर्शनाच्या प्राणात्मवादी विचारधारेचा उल्लेख पू. सुरेश्वराचार्यांनी मानसोल्लास ग्रंथाच्या उल्लास ५ श्लोक ६ मधे केला असून त्याचे निराकरण याच उल्लासात श्लोक १८ ते २२ अशा ५ श्लोकातून केले आहे.

**इन्द्रियात्मवादी चार्वाक :**

चार्वाकमताची एक विचारधारा 'इन्द्रियात्मवादी' म्हणजे इन्द्रिये हाच आत्मा आहे असे मत प्रतिपादन करणारी असल्याचे सदानंदाने आपल्या वेदान्तसार ग्रंथातही नोंदविले आहे (खण्ड. १९). तैत्तिरीय उपनिषदात 'इन्द्रियमय आत्मा' सांगितलेला नाही. परंतु उपनिषदात अनेक जागी इन्द्रियांसाठी प्राण हा शब्दही वापरला जातो हे लक्षात घेता इन्द्रियात्मवादाचा समावेश प्राणात्मवादात होतो असे म्हणता येते.

पू. सुरेश्वराचार्यांनी मानसोल्लास वार्तिकात या विचारधारेचा उल्लेख उल्लास ५ श्लोक ७ मधे केला असून त्याचे खंडन याच उल्लासात श्लोक १३ १/२ ते

१७ अशा ७ १/२ श्लोकातून केले आहे.

**विज्ञानात्मवादी चार्वाक :**

विज्ञान हे बुद्धीच्या स्तरावर होत असल्यामुळे 'बुद्धी हाच आत्मा आहे' असे मांडणारी बुद्ध्यात्मवादी चार्वाकमताची विचारधारा हीच विज्ञानात्मवादी विचारधारा म्हणता येते. तैत्तिरीय उपनिषदात 'विज्ञानमय आत्मा' ही संकल्पना आली आहे (तै.उ. २.४) सदानंदाच्या वेदान्सारातही विज्ञानात्मवाद ही बौद्धमताची एक विचारधारा असल्याचे म्हटले आहे.

पू. सुरेश्वराचार्यांनी आपल्या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्र वार्तिकाच्या पाचव्या उल्लासात श्लोक ८ मधे या मताचा उल्लेख केला असून याच उल्लासात श्लोक २३ ते २५ अशा ३ श्लोकातून त्याचे निराकरण केले आहे.

**संघातात्मवादी चार्वाक :**

चार्वाकमताची एक विचारधारा देहसंघातात्मवादी असल्याचा उल्लेखही येतो. दशोपनिषदावरील शांकरभाष्यातील अनेक पूर्वपक्ष–उत्तरपक्ष या विचाराला केन्द्र मानून करण्यात आले आहेत. **'चैतन्यविशिष्ट काय पुरूषः**– चेतन देह हाच पुरुष आहे' असे एक चार्वाकसूत्र असल्याची नोंदही आहे.

पू. सुरेश्वराचार्यांनी मानसोल्लास या वार्तिकात उल्लास ५ श्लोक २६ व २७ अशा दोन श्लोकातून हा विषय मांडला आहे. चार्वाकमत हे प्रत्यक्ष हेच एक प्रमाण स्वीकारत असल्याच्या मान्यतेचा उल्लेखही मानसोल्लासात २.१७ या स्थळी आला आहे.

याप्रमाणे मानसोल्लास वार्तिकाच्या पाचव्या उल्लासातील ३५ श्लोकांपैकी मिान २७ श्लोक चार्वाकमताची मांडणी व निराकरणात खर्ची पडले आहेत.

खरेतर देह, इन्द्रिये, प्राण, मन, विज्ञान व संघात अशा एकेका टप्प्यांनी चेतन–आत्मवादाकडे नेणारा हा वैचारिक प्रवास आहे. साधकाच्या अध्यात्मिक प्रगतीचा हा आलेखच आहे असे म्हणता येईल. सदानंदाचे वेदान्तसार वा जयन्तभट्टाची न्यायमंजरि या ग्रंथातील उल्लेख नीट पाहीले तर हे कुठले 'वाद' नसून वैचारिक विकासक्रमाचे टप्पे असल्याचे स्पष्ट होते.

प्राचीन भारतात हा विषय हेटाळणीचा वा त्याज्य तर नव्हताच उलट त्याचे अध्ययन करण्याच्या परंपरा होत्या. आचार्य विष्णुगुप्तांनी (कौटिल्य) अर्थशास्त्रात तर या–लोकायत–विचाराला सांख्य आणि योगाच्या बरोबरीने आन्वीक्षिकी विद्येत मानाचे स्थान दिले आहे. (कौ.अ. १.२.१०) मानसोल्लासातील चार्वाकमताची मांडणी लक्षात घेताना हा विचार जागृत ठेवणे आवश्यक आहे.

**मानसोल्लासातील सांख्यदर्शन :**

सांख्य–दर्शन हे भारतीय तत्त्वचिंतन परंपरेतील अतिशय महत्त्वाचे दर्शन आहे. 'सर्व ज्ञान सांख्यांपासून प्रवर्तित होते' (महा. शांति. ३०१.१०९) असा निर्वाळा खुद्द व्यासांनीच दिला आहे. कृष्णाच्या तोंडी वदविलेली गीता सांख्य आणि योग या दोन परस्परविरोधी विचारधारांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न करताना दिसते. अर्थात् गीतेतला हा 'योग' पतंजलीचा नाही हे देखील लक्षात घेणे आवश्यक आहे. योग म्हणजे कर्ममार्ग आणि सांख्य म्हणजे संन्यासमार्ग असे अर्थ तेथे अभिप्रेत आहेत.

सांख्यदर्शनाचे प्रवर्तक महर्षी कपिल हे कर्दम प्रजापती आणि देवहूतीचे पुत्र आहेत असे परंपरा मानते. कपिल मुनींच्या गौरवपूर्ण उल्लेख गीतेत **'सिद्धानां कपिलो मुनि–'** (गी. १०.२६) या शब्दात येतो. कपिलांच्या नावावर असलेला 'सांख्यसूत्र' नावाचा एक अर्वाचीन ग्रंथ उपलब्ध असून त्यावर विज्ञानभिक्षूचे भाष्य व महादेव वेदान्ती याचे सार आहे.

परंतु याहून प्राचीन असा सांख्यांचा ग्रंथ म्हणजे सांख्य–कारिका. हा ७० कारिकांचा ग्रंथ ईश्वरकृष्णाचा आहे. ईश्वरकृष्णाने आपली गुरू परंपरा कपिल–आसुरी–पंचशिख अशी दिली आहे. (सां.का. ७०)

व्यक्त, अव्यक्त आणि ज्ञ अशा तीन तत्त्वांच्या ज्ञानाने मानवी दु:खाची एकान्तिक व आत्यंतिक निवृत्ती होते. (सां.का. १) या जगत् प्रपंचाचे सृजन प्रकृति व पुरुष या परस्परविरोधी गुणधर्माच्या दोन तत्त्वांच्या विरोध–समन्वयातून उत्क्रांतीच्या प्रक्रियेने होते. (सां.का. २१) प्रकृति ही अचेतन त्रिगुणात्मिका– सत्त्व, रज आणि तम–आहे तर चेतन पुरुष साक्षी त्रिगुणातीत आहे या वास्तवाचा साक्षात्कार मुक्ती प्रदान करतो (सां.का. ६४) असे मांडणारे हे तत्त्वज्ञान सत्कार्यवादाला अनुसरणारा परिणामवाद स्वीकारते.

कार्य–कारण संबंध, वस्तुचे व उर्जेचे अविनाशीत्व असे वैज्ञनिक सिद्धांत या दर्शनाने दिले असून त्याबाबत तंत्र, योग, आयुर्वेद, ही शास्त्रे सांख्यांची ऋणी आहेत. वेदान्त विचाराचा अंतिम टप्पा देखील सांख्यांच्या सहाय्याशिवाय गाठता येत नाही.

सांख्यदर्शनाचा मूलभूत सिद्धांत असलेला प्रधानकारणवाद पू. सुरेश्वराचार्यांनी आपल्या 'मानसोल्लास' या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील वार्तिकात दुसऱ्या उल्लासातील श्लोक ७ व ८ अशा दोन श्लोकात मांडून श्लोक १३ व १४ अशा दोन श्लोकात त्याचे निराकरण करण्यात आले आहे. सांख्यदर्शन हे

प्रत्यक्ष, अनुमान व शब्द अशी तीन प्रमाणे स्वीकारते असेही २.१७ या स्थळी नोंदविले आहे. श्लोक ३१ ते ४१ १/२ अशा ११ १/२ श्लोकात सांख्य संकल्पना मांडल्या आहेत. मानसोल्लास वार्तिकात सांख्याचे मुद्देसुद असे स्पष्ट निराकरण नाही. तथापि वेदान्ताच्या चेतन आत्मसत्तावाद वा ईश्वरकर्तृत्ववादातच ते अनुस्यूत आहे.

**मानसोल्लास आणि न्याय-वैशेषिक दर्शने :**

वैदिक षड्दर्शनात समाविष्ट असलेली 'न्याय' आणि 'वैशेषिक' ही दोन दर्शने जोड-दर्शने समजली जातात. या दोन्ही दर्शनांविषयीचा विचार पू. सुरेश्वराचार्यांच्या प्रस्तुत वार्तिकात करण्यात आला आहे.

**मानसोल्लासातील वैशेषिक दर्शन :**

वैशेषिक-दर्शन हे विशेषांचा विचार करते म्हणून त्याचे नामकरण 'वैशेषिक' असे करण्यात आले आहे. महर्षी कणाद हे या दर्शनाचे प्रवर्तक असून त्यांचा 'वैशेषिक-सूत्र' हा सूत्रग्रंथ प्रसिद्ध आहे. या सूत्रग्रंथावर प्रशस्तपादाचार्यांचे 'पदार्थ-धर्म-संग्रह' नामक भाष्य आहे. यावर उपस्कार-भाष्य, चन्द्रानन्दी टिका असेही विवरण ग्रंथ आहेत. उदयनाचार्य, जयन्तभट्ट असे या परंपरेचे कांही उल्लेखनीय दार्शनिक आहेत. वैशेषिक दर्शन हे द्रव्य-गुण-कर्म-सामान्य-विशेष समवाय असे सहा पदार्थ (Categories) मानते. अभाव हा सातवा पदार्थही कांही ग्रंथकार स्वीकारतात. विश्वाचे मूलकारण परमाणू असून आण्विक संयोग-वियोगातून निर्मिती व विनाश होत असतो असे या दर्शनाचे मत आहे. पिलुपाकवाद व पिठरपाकवाद या वैज्ञानिक प्रक्रियांचा विचार तसेच गुरूत्व, नोदन इ. वैज्ञानिक संकल्पनांच्या मांडणीचे श्रेय या दर्शनाकडे जाते.

या दर्शनाची एक परंपरा चिन मधे अभ्यासली जात असे.

वैशेषिक-दर्शन हे परमाणूवादी असून कार्य-कारणभावाचा आरंभवादी सिद्धांत स्वीकारणारे आहे. आरंभवादानुसार कारणरूपी द्रव्याच्या विनाशातून कार्यरूप द्रव्याची निर्मिती होते.

या दर्शनाच्या सिद्धांताचा निर्देश पू. सुरेश्वराचार्यांच्या प्रस्तुत वार्तिकातील दुसऱ्या उल्लासातील श्लोक ७ व ८ अशा दोन श्लोकात आला असून, वैशेषिक संकल्पनांची मांडणी पुढे २.२० ते २.२८ अशा ९ श्लोकातून करण्यात आली आहे, तर या विचारधारेचे निराकरण २.९ ते २.१२ अशा तीन श्लोकात करण्यात आले आहे. याप्रमाणे एकूण १४ श्लोकातून वैशेषिकदर्शनांचा परिचय व निराकरण प्रस्तुत करण्यात आले आहे.

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांच्या मते आरंभवादी वैशेषिक हे तसे 'अर्ध-वैनाशिक (बौद्ध)' आहेत. ही भूमिका घेत वैशेषिकांचे खंडन आचार्यांनी आपल्या ब्रह्मसूत्र भाष्यात केले आहे.

**मानसोल्लासातील न्याय-दर्शन**

न्याय-दर्शनाचा प्रवर्तक अक्षपाद गौतम आहे. न्यायसूत्र हा गौतमाचा सूत्रग्रंथ या दर्शनाचा आधार असून त्यावर वात्स्यायनाचे भाष्य, उद्योतकरांचे वार्तिक व वाचस्पती मिश्रांची तात्पर्य-टीका यासारखे ग्रंथ उपलब्ध आहेत. उदयनाचार्यांच्या न्याय-कुसुमाञ्जलीचा उल्लेखही करावा लागेल. न्याय-दर्शनावरील ही ग्रंथसंपदा जे सिद्धांत मांडते ते 'प्राचीन-न्याय' म्हणून ओळखले जातात; तर मध्ययुगीन भारतात गंगेशोपाध्यायांच्या 'तत्त्वचिंतामणी' नंतर विकसीत झालेली शास्त्रसंपदा 'नव्यन्याय' म्हणून प्रसिद्ध आहे. न्याय दर्शन हे तर्कशास्त्र आहे.

न्याय-दर्शन हे सोळा पदार्थ मानते. हे पदार्थ म्हणजे प्रतिज्ञा, प्रमेय, संशय प्रयोजन इ. तर्कशुद्ध प्रतिपादनाची वाद-चर्चेची अंगे आहेत. या सर्वांच्या सम्यक्ज्ञानाने नि:श्रेयस्-मोक्ष प्राप्त होतो असा या दर्शनाचा सिद्धांत आहे. वैशेषिक दर्शनाला समांतर असा याचा विकास होत गेला आहे. ॲरिस्टॉटलच्या 'सिलॉजिजम्' सारखी 'पंचावयव वाक्य' अशी समांतर संकल्पना न्यायदर्शनाने दिली आहे. न्याय-दर्शन हे ईश्वरवादी आहे. या दर्शनानुसार ईश्वर हे जगत्-प्रपंचाचे निमित्तकारण आहे; जसा घटाचे निमित्तकारण कुंभार असतो.

पू. सुरेश्वराचार्यांनी मानसोल्लास वार्तिकात न्यायदर्शनाच्या प्रमाणविषयक भूमिकेचा उल्लेख उल्लास २ श्लोक १८ मधे केला असून न्याय-दर्शनाच्या 'ईश्वर निमित्तकारण आहे!' या सिद्धांताचे निराकरण याच उल्लासात श्लोक ५३ ते ५६ मधे करण्यात आले आहे. वेदान्तदर्शनानुसार ईश्वर-परब्रह्म हे जगत्सृजनाचे केवळ निमित्तकारणच नाही तर उपादानकारणही आहे.

याप्रमाणे श्रुती संमत अद्वैत वेदान्ताशी विरोधी ठरू शकणाऱ्या चार्वाक, सांख्य, वैशेषिक, न्याय व बौद्ध अशा प्रमुख दर्शनांचे निराकरण भगवान् पूज्यपाद सुरेश्वराचार्यांनी मानसोल्लासात प्रस्तुत केले आहे. जैनदर्शनाचा विचार या वार्तिकात सविस्तर करण्यात आलेला नाही.

**अनिर्वचनीय-ख्याति :**

ख्याति म्हणजे दार्शनिक सिद्धांत, ख्याति विषयक प्रतिपादन हा शांकरवेदान्ताचा एक महत्त्वाचा भाग आहे. ख्याति हा शब्द जगत्-प्रपंच अर्थात् दृश्य विषयांच्या प्रतीति बाबतची ज्ञात्याची धारणा सूचित करणारा आहे. वेदान्तात सत्-ख्याति,

असत्–ख्याति, अन्यथा ख्याति, अख्याति व अनिर्वचनियख्याति अशा ६ख्याति स्पष्ट केल्या जातात. शांकरवेदान्तात अनिर्वचनीय ख्याति स्वीकारण्यात आली आहे. ख्याति विषयक विचार पूज्यपाद आद्य शंकराचार्यांच्या शारिरक मीमांसा भाष्य अर्थात् ब्रह्मसूत्रभाष्याच्या उपोद्घातात आला आहे. पूज्यपाद श्री सुरेश्वराचार्यांनी प्रस्तुत वार्तिकात हा विषय उल्लास ७ श्लोक २२ ते ३१ अशा १० श्लोकातून मांडला आहे.

**प्रत्यभिज्ञा–निरूपण :**

प्रत्यभिज्ञा ही संकल्पना तशी काश्मिर–शैव परंपरेशी निगडीत असल्याचे समजले जाते. श्रीमन् महामहेश्वर श्री अभिनवगुप्तपादाचार्य हे प्रत्यभिज्ञा सिद्धांताचे प्रवर्तक मानले जातात. अभिनवगुप्तांनी शैवागमातील प्रचंड ग्रंथ निर्मिती केली आहे. त्यांच्या 'प्रत्यभिज्ञा हृदयम्' 'ईश्वर प्रत्यभिज्ञा विमर्शिनी' इ. ग्रंथातून हा विषय आला आहे. प्रत्यभिज्ञा हृदयाच्या प्रारंभीच ही संकल्पना 'शांकरोपनिषत्सार' आहे असे म्हटले असून 'ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी' या ग्रंथात **'प्रतीपमात्माभिमुख्येन ज्ञानं प्रकाशः प्रत्यभिज्ञा–'** अशी प्रत्यभिज्ञेची व्याख्या केली आहे.

पूज्यपाद श्री सुरेश्वराचार्यांनी प्रस्तुत मानसोल्लास वार्तिकात उल्लास ७ श्लोक १ ते १७ तसेच ३१, ३२ यास्थळी आला आहे. मधे 'प्रत्यभिज्ञायते' प्रत्यभिज्ञाप्रसिद्धये' असे शब्द स्पष्टपणे वापरले असून उल्लास ६ श्लोक १८ या स्थळीही बौद्ध मत निराकरणानंतर प्रत्यभिज्ञा हेच यथार्थ वास्तव मत असल्याचे नोंदविले आहे.

प्रत्यभिज्ञा म्हणजे ओळख पटणे. 'स्व' ची स्वतःच्या शिवस्वरूपाची ओळख पटणे. छान्दोग्य उपनिषदात ९ वेळा उपदेशिलेले 'तत्त्वमसि' हे महावाक्य 'ते परमार्थसत्स्वरूप परब्रह्म' तत्; तूच आहेस 'त्वं हे तत्' आहे. त्यात अद्वैत आहे. हे ओळखणे हीच प्रत्यभिज्ञा.

पूज्यपाद श्री विद्यारण्यस्वामींनी 'श्री अनुभूति प्रकाश' या उपनिषदांवरील त्यांच्या निरूपणात बृहदारण्यक उपनिषदातील काण्व विद्या प्रकाशात (अनु.प्र. १३.१२५) 'प्रत्यक् बोध' असा शब्द वापरला आहे.

तात्पर्य हेच की, सामान्यपणे शांकर वेदान्त हा केवलाद्वैती आणि अभिनवगुप्त हे प्रत्यभिज्ञावादी असे जे समजले जाते तेच मूळात चूकीचे ठरू शकते. ही समजूत जर चूक असेल तर पूज्यपाद आचार्यांच्या भाष्यांचा अन्वयार्थ प्रत्यभिज्ञेच्या परिभाषेत लावणे आवश्यक ठरते. ही शक्यता लक्षात घेतली तर शांकरवेदान्ताचा

अगदी वेगळथ अन्ययार्थ लागू शकतो. हा अधीक सूक्ष्म संशोधनाचा विषय ठरू शकेल.

**उपासना आणि योग :**

भारतीय परंपरेत सर्व सिद्धांतांचे ज्ञान हे केवळ बौद्धिक संकल्पनांच्या स्वरूपाचे नसून ते 'दर्शन' असते. यासाठी प्रत्यक्ष अनुभूती आवश्यक आहे. शैव, शाक्त, वैष्णव, द्वैत, विशिष्टाद्वैत, अद्वैत, बौद्ध, जैन या सर्वच विचारधारांनी ही अनुभूती प्राप्त होण्यासाठी उपासना अनिवार्य म्हटली आहे. उपासना ही योग साधनेशी संबंधीत आहे. अर्थातच पूज्यपाद श्री सुरेश्वराचार्यांनी आपल्या प्रस्तुत वार्तिकात ईश्वरोपासना, हठयोग, अष्टांग योग, नाडी संस्थान, षट्चक्र साधना इ. विषय प्रतिपादीले आहेत. हा विषय साधारणपणे उल्लास ४ व उल्लास ९ मधे आला आहे. यात हठयोगातील आसने, प्राणायाम, अष्टांग योगातील विविध संकल्पना आल्या आहेत. हे विवेचन पतंजलीच्या योगसूत्राहून कांहीसे वेगळे आहे तथापि पतंजलीला अनुसरणारे आहे.

शिवाय महत्त्वाचा मुद्दा असा की पू. सुरेश्वराचार्यांनी केलेल्या मांडणीचा आधार आचार्यांचे शारिरक भाष्य हाच असून उत्तरकालीन भाष्यकारांनी वार्तिककारांच्या निरूपणाचे सूत्र आपल्या निरूपणात स्वीकारलेले दिसून येते.

याप्रमाणे पूज्यपाद श्री सुरेश्वराचार्यांचा आद्य शंकराचार्यांच्या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील 'मानसोल्लास' हा वार्तिक ग्रंथ शांकरवेदान्तातीला संकल्पना स्पष्ट करणारा आहे. यावर अधिक सविस्तर अभ्यासपूर्ण संशोधन व निरूपण आवश्यक आहे. ते शांकर वेदान्ताविषयीच्या प्रचलीत मान्यतांना रद्दबातल ठरविणारे व नव्या दिशा देणारे ठरू शकते.



ß

# DeLe ceevemeeuueeme ÒeLeceeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee Heenuee Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील पहिल्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा पहिला उल्लास. या भागात विषयाचे प्रास्ताविक प्रस्तुत करण्यात आले आहे.

प्रस्तुत प्रारंभिक भागातील निरूपण हे पूज्यपाद सुरेश्वराचार्यांचे संबंध वार्तिक आहे.

**मङ्गलाचरणम्**

मानसोल्लास ग्रंथाचे मंगलाचरण करीत वार्तीककार म्हणतात...

**।।१।।**

**मङ्गलं दिशतु मे विनायकःमङ्गलं दिशतु मे सरस्वती।**
**मङ्गलं दिशतु मे महेश्वरी मङ्गलं दिशतु मे सदाशिवः ।।**

**श्लोकार्थ :** श्री गजाननाला सर्व मंगलासाठी नमस्कार असो. श्री देवी सरस्वतीला सर्व मंगलार्थ नमस्कार असो. श्री महेश्वरीला सर्व मंगल होण्यासाठी नमस्कार असो. श्री सदाशिवाला सर्व मंगलार्थ नमस्कार असो. सर्वांचे मंगल होवो. सर्वांचे कल्याण असो. ग्रंथ निर्विघ्नपणे पूर्ण होवो.

❖❖❖

**।।२।।**

**आत्मलाभात् परो लाभो नास्तीति मुनयो विदुः।**
**तल्लाभार्थं कविः स्तौति स्वात्मानं परमेश्वरम् ।।**

**श्लोकार्थ :** आत्मलाभाहून श्रेष्ठ असा दुसरा कोणताही लाभ नाही असे मुनिजनांनी प्रतिपादन केले आहे तो सर्वश्रेष्ठ आत्मलाभ प्राप्त करून घेण्यासाठी कवी तत्त्वज्ञ सर्वज्ञ भगवान् भाष्यकार पूज्यपादांनी स्वात्मस्वरूप परमेश्वराची स्तुती श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राने केली आहे.

❖❖❖

**।।३।।**

**स्वेच्छया सृष्टमाविश्य विश्वं यो मनसि स्थितः।**
**स्तोत्रेण स्तूयतेऽ नेन स एव परमेश्वरः।।**

**श्लोकार्थ :** स्वेच्छेने निर्माण केलेल्या या विश्वात प्रवेश करून जो अंत:करणाचे ठायी स्थित असतो, त्या परमेश्वराची स्तुतीच पूज्यपाद शंकराचार्यांनी या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राने केली आहे.



**अस्तित्वप्रकाशत्वयोराधारः कः - अस्तित्व आणि प्रकाशत्व याचा आधार काय ?**

अस्तित्व आणि प्रकाशत्व याचा आधार स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।४।।

**अस्ति प्रकाशत इति व्यवहारः प्रवर्तते।**
**तच्चास्तित्वं प्रकाशत्वं कस्मिन्नर्थे प्रतिष्ठितम्।।**

**श्लोकार्थ :** अस्तित्व आणि प्रकाशत्व यांच्या आधारावर सर्व व्यवहार प्रवर्तित होत असतो ते अस्तित्व आणि प्रकाशत्व कोणत्या वस्तूच्या आधारावर प्रतिष्ठीत असते.



**ईश्वरत्वजीवत्वे कीदृशे - ईश्वरत्व आणि जिवत्वाचे स्वरूप काय ?**

ईश्वरत्व आणि जिवत्वाचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।५।।

**किं तेषु तेषु वाऽ र्थेषु किं वा सर्वात्मनीश्वरे।**
**ईश्वरत्वञ्च जीवत्वं सर्वात्मत्वञ्च कीदृशम्।।**

**श्लोकार्थ :** अस्तित्व आणि प्रकाशत्व हे त्या त्या अर्थाचे ठायी विद्यमान असते अथवा सर्वात्मक ईश्वराचे ठायी ? तसेच ईश्वरत्व, जीवत्व आणि सर्वात्मकत्व यांचे स्वरूप कसे आहे ?



।।६।।

**जानीयात्तत्कथं जीवः किं तज्ज्ञानस्य साधनम्।**
**ज्ञानात्तस्य फलं किं स्यादेकत्वञ्च कथं भवेत्।।**

**श्लोकार्थ :** जीवाला त्याचे ज्ञान कसे होते ? जीवनाचे ते तत्त्व कसे जाणून घ्यावे ? त्या ज्ञानाचे साधन काय ? त्या ज्ञानाचे फळ काय ? आणि एकत्वाची अनुभूती कशी येते ?



पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील पहिला श्लोक खालील प्रमाणे आहे.

**।।१।।**

**विश्वं दर्पणदृश्यमाननगरीतुल्यं निजान्तर्गतं**
**पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया।**
**यः साक्षात्कुरुते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयं**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

विश्व हे एखाद्या आरशात दिसून येणाऱ्या नगराच्या प्रतिबिम्बासारखे आपल्याच अंतःकरणात प्रतीत होत असते. स्वप्नावस्थेत जसे हे बाहेरचे विश्व आतल्या बाजूस प्रतीत होत असते, तसेच मायेच्या प्रभावाने आपल्याच अंतरातील प्रतीति बाहेर प्रकट झाल्यासारखी दिसून येत असते स्वप्नावस्थेतून जाग येताच वस्तुस्थिती जशी प्रत्यक्ष अनुभवास येते, त्याचप्रमाणे परमार्थ प्रबोधाचे वेळी आपले आत्मस्वरूपच अखण्ड अद्वय स्वरूपात सर्वत्र अनुभवास येते. हा साक्षात्कार घडविणाऱ्या परमाचार्य सद्गुरू श्री दक्षिणामूर्तीस माझा नमस्कार असो.



।।७।।

**सर्वज्ञस्सर्वकर्ता च कथमात्मा भविष्यति।**
**शिष्य प्रतीत्थं पृच्छन्तं वक्तुमारभते गुरुः।।**

**श्लोकार्थ :** जीवात्मा सर्वज्ञ आणि सर्वकर्ता कशा प्रकारे होतो ? शिष्याने असे प्रश्न विचारल्यानंतर सद्‌गुरू आपले निरूपण प्रारंभ करीत म्हणतात...



**अस्यार्थः** –

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील पहिल्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांचे वार्तिक खालीलप्रमाणे आहे.

**प्रपञ्चस्वरूपम् – प्रपंचाचे स्वरूप**

प्रपंचाचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।८।।

**अन्तरस्मिन्निमे लोका अन्तरस्मिन्निदं जगत्।**
**बहिर्वन्मायया भाति दर्पणे स्वशरीरवत्।।**

**श्लोकार्थ :** हे सर्व लोक आपल्याच अंतःकरणात असतात. हे संपूर्ण जगत् देखील आपल्याच अंतरात असते. आरशात जसे आपलेच शरीर आत असल्याची भासमान प्रतीति येत असते तशीच मायेच्या प्रभावाने या विश्वाची बाह्य प्रतीति येत असते.



।।९।।

**स्वप्ने स्वान्तर्गतं विश्वं यथा पृथगवेक्षते।**
**तथैव जाग्रत्कालेऽपि प्रपञ्चोऽयं विविच्यताम्।।**

**श्लोकार्थ :** स्वप्नावस्थेत जसे हे बाह्य विश्व आपल्याला आपल्या अंतःकरणातच आपल्या बाहेर वेगळे असल्याची प्रतीति येत असते तसेच जागृतावस्थेत देखील मायेच्या प्रभावाने हा जगत् प्रपंच बाहेर असल्याची प्रतीति आपल्याला येत असते.



**स्वप्नजाग्रतोः सत्तयोः समानता – स्वप्न आणि जागृती या अवस्थांतील अनुभवाचे साम्य :**

स्वप्न आणि जागृति या अवस्थांतील अनुभूतीचे साम्य स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१०।।

**स्वप्ने स्वसत्तैवार्थानां सत्ता नान्येति निश्चिता।।**
**को जाग्रति विशेषोऽस्ति जडानामाशुनाशिनाम्।।**

**श्लोकार्थ :** स्वप्नावस्थेत अनुभवास येणाऱ्या अर्थरूप पदार्थांची सत्ता एका आत्मसत्तेच्या आधाराशिवाय स्वतंत्र अशी वेगळी नसते हे निश्चित आहे, तसेच जागृतावस्थेतील या प्रतिक्षण नाश पावणाऱ्या जड जगताची सत्ता देखील एका आत्मसत्तेहून वेगळी अशी कोणती असणार आहे ?



।।११।।

**स्वप्ने प्रकाशो भावानां स्वप्रकाशान्न हीतरः।**
**जाग्रत्यपि तथैवेति निश्चिन्वन्ति विपश्चितः।।**

**श्लोकार्थ :** स्वप्नावस्थेतील भावरूप प्रतीतिचा प्रकाश हा आत्मसत्तेच्या स्वयं प्रकाशाहून जसा वेगळा नसतो, तसाच जागृतावस्थेतील भावरूप प्रतीतिचा प्रकाश देखील आत्मसत्तेच्या प्रकाशाहून वेगळा नसल्याचे 'विपशी'– म्हणजे अंतर्मुख होऊन चिंतन करणाऱ्या आत्मज्ञानी विद्वज्जनांनी निश्चित केले आहे.



**'प्रबोधसमये' इत्यस्य व्याख्या – प्रबोधसमये या शब्दाचे स्पष्टीकरण :**

प्रबोधसमये या शब्दाचे स्पष्टीकरण करीत वार्तिककार म्हणतात...

।।१२।।

**निद्रया दर्शितानर्थान् न पश्यति यथोत्थितः।**
**सम्यग्ज्ञानोदयादूर्ध्वं तथा विश्वं न पश्यति।।**

**श्लोकार्थ :** स्वप्नावस्थेत दिसून आलेले पदार्थ जसे जाग आल्यानंतर दिसून येत नाहीत, तसेच सम्यक्ज्ञानाचा उदय झाल्यानंतर या विश्वाची प्रतीति देखील येत नाही.



।।१३।।

**अनादिमायया सुप्तो यदा जीवो विबुध्यते।**
**अजमनिद्रमस्वप्नमद्वैतं बुध्यते तदा।।**

**श्लोकार्थ :** अनादि मायेच्या प्रभावाखाली प्रसुप्तावस्थेत असलेल्या जीवाला जेंव्हा परमार्थज्ञानाचा बोधरूप प्रकाश लाभून ज्ञानजागृतावस्था प्राप्त होते तेंव्हा त्या अ–निद्र व अ–स्वप्न अवस्थेत त्यास आपल्या अज आणि अद्वैत स्वरूपाचा

बोध होतो.



।।१४।।

**श्रुत्याचार्यप्रसादेन योगाभ्यासबलेन च।**
**ईश्वरानुग्रहेणापि स्वात्मबोधो यदा भवेत्।।**

**श्लोकार्थ :** श्रुती माऊलीच्या कृपेने, आचार्यांच्या कृपाप्रसादाने, योगाभ्यासाच्या बळाने वा परमेश्वराच्या अनुग्रहाने जीवाला जेंव्हा आत्मस्वरूपाचा बोध होतो तेंव्हा.....



।।१५।।

**भुक्तं यथान्नं कुक्षिस्थं स्वात्मत्वेनैव पश्यति।**
**पूर्णाहन्ताकवलितं विश्वं योगीश्वरस्तदा।।**

**श्लोकार्थ :** आपल्या पोटात असलेले आपण खाल्लेले अन्न हे जसे आपल्याच स्वरूपाचा एक भाग म्हणून आपण पाहतो, तसेच या संपूर्ण विश्वाचाच ग्रास करणारा तो योगिश्वर या विश्वाला आत्मस्वरूपाचाच एक भाग म्हणून पाहतो.



।।१६।।

**यथा स्वप्ने नृपो भूत्वा भुक्त्वा भोगान् यथेप्सितान्।**
**चतुरङ्गबलोपेतः शत्रुं जित्वा रणाङ्गणे।।**

**श्लोकार्थ :** एखाद्या माणसाला असे स्वप्न पडते की स्वप्नात तो राजा झाला आहे आणि सर्व प्रकारचे इच्छित उपभोग त्याने प्राप्त केले आहेत, त्यास चतुरंग सैन्याचे बळ प्राप्त झाले असून त्याने रणांगणात शत्रूला जिंकले आहे!



।।१७।।

**परात् पराजितो भूत्वा वनं प्राप्य तपश्चरन्।**
**मुहूर्तमात्रमात्मानं मन्यते कल्पजीविनम्।।**

**श्लोकार्थ :** त्यानंतर तो पराभूत झाला असून तो वनात तपाचरण करीत आहे! असेही तो पाहतो. अशा प्रकारे मुहूर्तभरात कल्पभराचे जीवन जगल्यासारखे त्यास वाटते.



।।१८।।

**तथैव जाग्रत्कालेऽपि मनोराज्यं करोत्यसौ।**
**कालगत्या च योगेन क्षीणमायुर्न पश्यति।।**

**श्लोकार्थ :** त्याचप्रमाणे जागृतावस्थेतही तो विविध मनोराज्ये करीत असतो. अशा स्वप्न राज्यात रममाण झालेल्या त्याला कालौघात क्षीण होत चाललेल्या या आयुष्याचे भान राहत नाही!



।।१९।।

**मेघच्छन्नोंशुमालीव मायया मोहितोऽधिकम्।**
**किञ्चित्कर्ता च किञ्चिज्ज्ञो लक्ष्यते परमेश्वरः।।**

**श्लोकार्थ :** ढगांच्या आवरणाखाली झाकलेला सूर्य जसा आपल्या स्वरूपाचा प्रकाश प्रकट करीत नाही, तसेच मायेच्या उपाधीने मोहीत झालेला जीवही आपले चैतन्यघन परमेश्वरी स्वरूप अज्ञानाने झाकले गेले असल्यामुळे स्वतःला अल्प क्रियावान् व अल्पज्ञ समजत असतो.



।।२०।।

**यद्यत्करोति जानाति तस्मिंस्तस्मिन् परेश्वरः।**
**राजा विद्वान् स्वसामर्थ्यादीश्वरोऽयमितीर्यते।।**

**श्लोकार्थ :** मनुष्य जे कांही करतो वा जे कांही जाणतो ते परमेश्वराच्या स्व–सामर्थ्यामुळेच, एखादा राजा हा परमेश्वर आहे वा एखादा विद्वान् परमेश्वर आहे असे जे म्हटले जाते ते त्याच्या स्व–सामर्थ्यामुळेच.



।।२१।।

**ज्ञानक्रिये शिवेनैक्यात् सङ्क्रान्ते सर्वजन्तुषु।**
**ईश्वरत्वञ्च जीवानां सिद्धं तच्छ्रुतिसङ्गमात्।।**

**श्लोकार्थ :** सर्व प्राणिमात्रांमध्ये जी ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती संक्रमित झालेली दिसून येते ती त्यांच्या शिवतत्त्वाशी असलेल्या एकत्वामुळेच. त्या परमतत्त्वाच्या शक्तीशी एकत्व असल्यामुळेच जीवाचे ईश्वरत्व हे स्वयंसिद्ध आहे.



**ज्ञानस्य स्वयम्प्रकाशता – ज्ञानाची स्वयंप्रकाशिता**



ज्ञानाची स्वयंप्रकाशिता स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२२।।

**अयं घटोऽयं पट इत्येवं नानाप्रतीतिषु।**
**अर्कप्रभेव स्वज्ञानं तत् स्वयमेव प्रकाशते।।**

**श्लोकार्थ :** सूर्याच्या प्रकाशासारखे आत्मस्वरूपाचे स्वयंप्रकाशीत ज्ञान हेच 'हा घट आहे, हा पट आहे' अशा नानाविध प्रतीतितून आपणहून प्रकाशित होत असते.



।।२३।।

**ज्ञानं न चेत् स्वयंसिद्धं जगदन्धं तमो भवेत्।।**
**न चेदस्य क्रिया काचिद्व्यवहारः कथं भवेत्।।**

**श्लोकार्थ :** ज्ञान हे जर स्वयंसिद्ध नसते; तर हे संपूर्ण जगत् अज्ञान अंध:काररूपच होऊन राहीले असते! अशा अवस्थेत कोणतिही क्रिया वा कोणताही जगत् व्यवहार कसा अस्तित्वात आला असता ?



**ज्ञानक्रिययोरभेदः – ज्ञान आणि क्रिया यातील अभेद**

ज्ञान आणि क्रिया यातील अभेद स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२४।।

**क्रिया नाम परिस्पन्दपरिणामस्वरूपिणी ।**
**स्पन्दमाने बहिर्ज्ञाने तदङ्कुरवदुद्भवेत् ।।**

**श्लोकार्थ :** प्रकृतिचा परिणाम स्वरूप असा परिस्पंद हाच क्रिया म्हणून ओळखला जातो. बाह्य ज्ञानाचे स्पंदन होऊ लागताच ती क्रिया अंकूरासारखी बाहेर पडते.



।।२५।।

**उत्पाद्यप्राप्यसंस्कार्यविकार्योपाश्रया क्रिया।।**
**करोती गच्छत्युन्मार्ष्टि छिनत्तीति प्रतीयत।।**

**श्लोकार्थ :** क्रिया ही उत्पाद्य, प्राप्य, संस्कार्य व विकार्य अशी चार प्रकारची असून करणे, जाणे, घासणे व कापणे अशा विविध कृतीतून ती प्रतीत होत असते.



।।२६।।

**शिवो ब्रह्मादिदेहेषु सर्वज्ञ इति भासते।**
**देवतिर्यङ्मनुष्येषु किञ्चिज्ज्ञस्तारतम्यतः।।**

**श्लोकार्थ :** एकमेव शिवतत्त्व हेच ब्रह्मादिकांच्या देहाचे ठायी सर्वज्ञ म्हणून प्रकाशित होत असते, आणि देव, तिर्यक् व मनुष्य योनीतील देहात तेच ज्ञानस्वरूप अल्पज्ञतेच्या रूपात तारतम्याने प्रतीत होत असते.



।।२७।।

**जरायुजो ऽ ण्डजश्चैव स्वेदजः पुनरुद्भिदः।**
**एते चतुर्विधाः देहाः क्रमशो न्यूनवृत्तयः।।**

**श्लोकार्थ :** जरायुज म्हणजे शरीरापासून उत्पन होणारे, अण्डज म्हणजे अंड्यापासून उत्पन होणारे, स्वेदज म्हणजे घामापासून उत्पन्न होणारे आणि उद्भिद म्हणजे बीजापासून उत्पन्न होणारे असे देहाचे चार प्रकार असून ते उत्तरोत्तर क्रमाने कमी ज्ञान असलेले आहेत.



।।२८।।

**ब्रह्मादिस्तम्बपर्यन्ता स्वप्नकल्पैव कल्पना।**
**साक्षात्कृतेऽनवच्छिन्ने प्रकाशे परमात्मनि।।**

**श्लोकार्थ :** परमात्मस्वरूपाच्या अखंड प्रकाशाचा साक्षात्कार झाला म्हणजे ब्रह्मदेवापासून ते स्तम्भापर्यंत सर्वकांही स्वप्नवत् कल्पना असल्याची प्रतीति येते.



।।२९।।

**अणोरणीयान् महतो महीयान् इति वेदवाक्।**
**रुद्रोपनिषदप्येवं स्तौति सर्वात्मकं शिवम्।।**

**श्लोकार्थ :** ते परमार्थ परमात्मतत्त्व अणूहूनही लहान आणि महताहूनही मोठे असल्याचे वेदवाणीने वर्णन केले आहे. रुद्रोपनिषदोतही सर्वात्मक शिवाचीच स्तुती करण्यात आली आहे.



।।३०।।

**ईश्वरो गुरुरात्मेति मूर्तिभेदविभागिने।**
**व्योमवद्व्याप्तदेहाय दक्षिणामूर्तये नमः।।**

**श्लोकार्थ :** ईश्वर, गुरू आणि आत्मा अशा मूर्तीरूपात विभाजित झालेल्या आकाशासारखा व्यापक देह असलेल्या भगवान् श्री दक्षिणामूर्तीस नमस्कार असो.



।।३१।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे प्रथमोल्लाससङ्ग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्रीदक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्धाचा पहिला उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे प्रथमोल्लासः।।**
**श्री मानसोल्लास ग्रंथाचा पहिला उल्लास पूर्ण झाला.**
**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा प्रथम उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



ॐ

# DeLe ceevemeeuueeme eÜlee³eeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee omeje Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील दुसऱ्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा दुसरा उल्लास. या भागात प्रामुख्याने महर्षी कणादाच्या वैशेषिकदर्शनातील परमाणुवाद आणि पदार्थ निरूपण तसेच सांख्यांचे तत्त्व निरूपण आणि पौराणिक व शैवागमातील सिद्धांत प्रस्तुत करण्यात आले आहेत.

**परमाणुवादोपस्थापनम् – परमाणूवादाची मांडणी**

पूज्यपाद भगवान् श्री सुरेश्वराचार्यांनी प्रथम परमाणूवादी वैशेषिक दर्शनाची भूमिका प्रस्तुत केली आहे....

।।१।।

**उपादानं प्रपञ्चस्य संयुक्ताः परमाणवः।**
**मृदन्वितो घटस्तस्माद्भासते नेश्वरान्वितः।।**

**श्लोकार्थ :** जगत् प्रपंचाचे उपादानकारण संयुक्त झालेले परमाणू हेच आहे; म्हणूनच घट हा मातीचा बनलेला आहे असे दिसून येते. तो ईश्वरयुक्त आहे असे दिसून येत नाही!



।।२।।

**परमाणुगता एव गुणाः रूपरसादयः।**
**कार्ये समानजातीयमारभन्ते गुणान्तरम्।।**

**श्लोकार्थ :** द्रव्याचे जे रूप, रस इ. गुण परमाणुगत असतात. तेच त्या द्रव्यापासून उत्पन्न होणाऱ्या कार्याचे ठायी समानजातीय अशा अन्य गुणांची निर्मिती करीत असतात.



।।३।।

**कार्यं यत्र समन्वेति कारणं समवायि तत्।**
**चक्राद्यं साधनं यत्तु घटस्यासमवायि तत्।।**

**श्लोकार्थ :** एखादे कार्य ज्या कारणाचे ठायी समन्वीत रूपाने राहते ते त्या कार्याचे समवायीकारण म्हणून ओळखले जाते, तर ते उत्पन्न करण्यासाठी आवश्यक

असलेली साधने हे त्याचे असमवायीकारण समजले जाते. उदा. घटाचे माती हे समवायीकरण आहे, तर चक्र-दांडा इ. साधने घटाची असमवायी कारणे होत.



।।४।।

**समवायिनि तिष्ठेद्यत् समवाय्याश्रये तथा।**
**कार्येऽ वधृतसामर्थ्यं कल्प्यतेऽ समवायि तत्।।**

**श्लोकार्थ :** एखाद्या वस्तू/पदार्थाच्या समवायीकारणात अथवा समवायी-कारणाच्या आश्रयाचे ठायी विद्यमान असणाऱ्या कार्यपूर्तीसाठी अनिवार्य असलेल्या कारणास असमवायीकारण असे म्हटले जाते.



।।५।।

**निमित्तं कारणं तेषामीश्वरश्च कुलालवत्।**
**यत् कार्यं जायते यस्मात् तस्मिन् तत् प्रतितिष्ठति।।**

**श्लोकार्थ :** घटाच्या निर्मितीचे निमित्तकारण जसा कुंभार असतो तसेच या विश्वाचे निमित्तकारण परमेश्वर आहे. (न्याय-वैशेषिक संमत सर्व पदार्थांच्या निर्मितीचे निमित्तकारण ईश्वर हेच आहे.) एखादे कार्य ज्या कशापासून उत्पन्न होते त्याचे ठायीच ते प्रतिष्ठीत असते.



।।६।।

**मृत्तिकायां घटस्तन्तौ पटः स्वर्णेऽङ्गुलीयकम्।**
**इति वैशेषिकाः प्राहुः तथा नैयायिका अपि।।**

**श्लोकार्थ :** जसे घट हा मृत्तिकेचे ठायी प्रतिष्ठीत असतो, पट (वस्त्र) हे धाग्याचे ठायी प्रतिष्ठीत असते वा अंगठी सोन्याचे ठायी असे वैशेषिकांचे तसेच नैय्यायिकांचेही मत आहे. या नुसार उपादानकारण व निमित्तकारण ही वेगळी आहेत.



**साङ्ख्यमतोपक्रमः - सांख्यमत निरूपण**

सांख्यमत निरूपण पुढील दोन श्लोकातून स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।७।।

**रजस्सत्त्वं तमश्चेति प्रधानस्य गुणास्त्रयः।**
**रजो रक्तं चलं तेषु सत्त्वं शुक्लं प्रतिष्ठितम्।।**

**श्लोकार्थ :** प्रधान अर्थात् मूलप्रकृतीची घटना सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांची बनलेली आहे. त्यापैकी रज हे रक्तवर्ण असून चल आहे तर सत्त्व हे शुक्लवर्ण असून प्रकाशक आहे.



**।।८।।**

**तमः कृष्णं चावरकं सृष्टिस्थित्यन्तहेतवः।**
**इति साङ्ख्याश्च भाषन्ते तेषामुत्तरमुच्यते।।**

**श्लोकार्थ :** तर तमोगुण हा कृष्णवर्ण असून आवरण घालणारा आहे असे प्रतिपादन सांख्य करीत असतात सांख्य प्रतिपादनाचे खण्डन येथे करण्यात येत आहे. त्यानुसार उपादानकारण व निमित्तकारण ही वेगळी आहेत.



**न्यायसांख्यमतयोर्निरासः – न्याय व सांख्य मताचे निराकरण**

श्री दक्षिणामूर्ति स्तोत्राच्या दुसऱ्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांचे वार्तिक खालीलप्रमाणे आहे. सांख्य व न्यायमताचे संक्षिप्त निराकरण पुढील श्लोकातून प्रस्तुत करण्यात आले आहे.

**।।९।।**

**अङ्कुरादिफलान्तेषु कार्येष्वस्तित्वमिष्यते।**
**कुत आगत्य सम्बद्धाः वटबीजेषु ते कणाः।।**

**श्लोकार्थ :** अंकुरापासून ते फळापर्यंतच्या सर्वच कार्याची सत्ता स्वीकारली जात असल्यामुळे वटवृक्षाच्या बीजाच्या परमाणूचा संबंध कोठून येतो ?



**।।१०।।**

**कारणान्तर्गतं कार्यमिति सर्वैश्च सम्मतम्।**
**तस्मात् सत्ता स्फुरत्ता च सर्वत्राप्यनुवर्तते।।**

**श्लोकार्थ :** कार्य हे कारणातच सूक्ष्म रूपाने असते हे सर्वांनाच मान्य आहे. त्यामुळे मूळ उपादानकारणाचे ठायी असलेली सत्ता व स्फुरण हे सर्व कार्याचे ठायी दिसून येते.



पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील दुसरा श्लोक खालील प्रमाणे आहे.

**।।२।।**

**बीजस्यान्तरिवाङ्कुरो जगदिदं प्राङ् निर्विकल्पं पुनः**
**मायाकल्पितदेशकालकलनावैचित्र्यचित्रीकृतम्।**
**मायावीव विजृम्भयत्यपि महायोगीव यः स्वेच्छया**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

बीजाच्या अंतरात अंकूर जसा सूक्ष्म-अव्यक्त रूपात स्थित असतो तसेच हे नामरूपात्मक जगत् निर्विकल्प रूपात मूळारंभी स्थित असते. मायेच्या प्रभावाने एखाद्या कल्पनेसारख्या उत्पन्न होणाऱ्या देश-कालाच्या संदर्भामुळे हे नामरूपात्मक चित्र-विचित्र जगत् उत्पन्न होते. एखादा मायावी वा महायोगी जसा आपल्या इच्छामात्रेकरून माया विश्वाची निर्मिती करतो तसेच हे समजावे. त्या गुरूरूपात अवतरलेल्या श्री दक्षिणामूर्तीला माझा नमस्कार असो.



।।११।।

**पुष्पे फलत्वमापन्ने क्षीरे च दधितां गते।**
**विजातीयाः प्रवर्तन्ते गुणा रूपरसादयः।।**

**श्लोकार्थ :** फुलाला जेंव्हा फळाचे रूप प्राप्त होते वा दूधाला जेंव्हा दह्याचे स्वरूप प्राप्त होते तेंव्हा त्या कार्याचे ठायी कारणाच्या गुणाहून विजातीय असे रूप-रस इ. गुण उत्पन्न होतात.



।।१२।।

**कारणं कार्यमंशोंऽशी जातिव्यक्ती गुणी गुणः।**
**क्रिया क्रियावानित्याद्याः प्रकाशस्यैव कल्पनाः।।**

**श्लोकार्थ :** कारण आणि कार्य, अंश आणि अंशी, जाति आणि व्यक्ती, गुण आणि गुणी, क्रिया आणि क्रियावान् अशा भेददृष्टीने स्पष्ट करण्यात येणारे हे सर्व संबंध एकाच ज्ञानस्वरूप तत्त्वाच्या आश्रयाने होणारे कल्पनारूप व्यवहार मात्र आहेत.



**प्रधानकारणवादनिरासः - प्रधानकारणवादाचे निराकरण**

पुढील दोन श्लोकातून श्री सुरेश्वराचार्यांनी सांख्यांच्या प्रधानकारणवादाचे निराकरण केले आहे...

।।१३।।

**चैतन्यं परमाणूनां प्रधानस्यापि नेष्यते।**
**ज्ञानक्रिये जगत्क्लृप्तौ दृश्येते चेतनाश्रये।।**

**श्लोकार्थ :** प्रधान मूल प्रकृति अथवा परमाणू यांच्या आश्रयाने चैतन्य असते असे दिसून येत नाही. तसेच प्रकृति वा परमाणू चेतन आहेत असेही दिसून येत नाही. ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती (ज्ञान व क्रिया) या दोन्ही बाबी चैतन्याच्या आश्रयाने असतात असेच या जगात अनुभवास येते.



।।१४।।

**कालरुपक्रियाशक्त्या क्षीरात् परिणमेद्दधि।**
**ज्ञातृज्ञानज्ञेयरूपं ज्ञानशक्त्या भवेज्जगत्।।**

**श्लोकार्थ :** दूध दह्याच्या रूपात परिणाम पावते ते कालरूप क्रियाशक्तीच्या प्रभावानेच. ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीच्या रूपात व्यक्त होणार हे जगत्

ज्ञानशक्तीतूनच प्रकट होते.



**ज्ञानभेदा :- ज्ञानाचे भेद**

ज्ञानाचे प्रकार स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**।।१५।।**

**ज्ञानं द्विधा वस्तुमात्रद्योतकं निर्विकल्पकम्।**
**सविकल्पं तु संज्ञादिद्योतकत्वादनेकधा।।**

**श्लोकार्थ :** ज्ञान-ज्ञानशक्ती दोन प्रकारची असते वस्तुमात्राचा निर्देश करणारे ज्ञान पहिल्या प्रकारचे असून त्यास 'निर्विकल्पक' असे म्हणतात. दुसऱ्या प्रकारचे ज्ञान 'सविकल्पक' असून ते नामरूपात्मक भेद प्रदर्शित करणारे अनेक प्रकारचे असते.



**।।१६।।**

**सङ्कल्पसंशयभ्रान्तिस्मृतिसादृश्यनिश्चयाः।**
**ऊहोऽ नध्यवसायश्च तथाऽन्येऽनुभवा अपि।।**

**श्लोकार्थ :** संकल्प, संशय, भ्रान्ती, स्मृति, सादृश्य, निश्चय, उह, अनध्यवसाय हे आणि इतर अनुभव देखील ज्ञानशक्तीचेच प्रकार आहेत.



**प्रमाणविषये मतानि - प्रमाणविषयक मतमतांतरे**

पुढील तीन श्लोकातून प्रमाणविषयक मतमतांतरे संक्षेपाने स्पष्ट करण्यात आली आहेत...

**।।१७।।**

**प्रत्यक्षमेकं चार्वाकाः कणादसुगतौ पुनः।**
**अनुमानञ्च तच्चापि साङ्ख्याश्शब्दं च ते अपि।।**

**श्लोकार्थ :** चार्वाकदर्शन प्रत्यक्ष हे एकच प्रमाण मानते. बौद्ध आणि वैशेषिक ही दर्शने प्रत्यक्ष व अनुमान अशी दोन प्रमाणे मानतात. सांख्यमतानुयायी प्रत्यक्ष व अनुमाना बरोबर शब्दप्रामाण्याचाही स्वीकार करतात.



**।।१८।।**

**न्यायैकदेशिनोऽप्येवमुपमानं च केचन।**
**अर्थापत्त्यासहैतानि चत्वार्याह प्रभाकरः।।**

**श्लोकार्थ :** एकदेशी न्यायमतावलंबी देखील ही तीन प्रमाणे मानतात तर कांही दार्शनिक उपमान हे देखील प्रमाण मानतात. प्रभाकराला अनुसरणारे पूर्वमीमांसक

प्रत्यक्ष, अनुमान, शब्द व उपमान या चार प्रमाणाबरोबरच अर्थापत्ति या प्रमाणाचाही स्वीकार करतात.



।।१९।।

**अभावषष्ठान्येतानि भाट्टाः वेदान्तिनस्तथा।**
**सम्भवैतिह्ययुक्तानि तानि पौराणिका जगुः।।**

**श्लोकार्थ :** कुमारिलास अनुसरणारे भाट्ट पूर्वमीमांसक तसेच वेदान्ती अभाव हे सहावे प्रमाणही मानतात. पौराणिक मतानुयायी संभव, एतिह्य व इतिहास ही देखील प्रमाणे म्हणून स्वीकारतात.



**वैशेषिकपदार्थव्यवस्थाः – वैशेषिक दर्शनाचा संक्षिप्त परिचय**

वैशेषिकदर्शनाचा संक्षिप्त परिचय स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२०।।

**द्रव्यं गुणस्तथा कर्म सामान्यं सविशेषकम्।**
**समवायं च काणादाः पदार्थान् षट् प्रचक्षते।।**

**श्लोकार्थ :** महर्षि कणादांनी प्रवर्तित केलेल्या वैशेषिक दर्शनानुसार द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष व समवाय हे सहा पदार्थ असल्याचे प्रतिपादन करण्यात आले आहे.



।।२१।।

**नव द्रव्याणि भूतानि दिक्कालात्ममनांसि च।**
**चतुर्विंशतिरेव स्युः गुणाः शब्दादिपञ्चकम्।।**

**श्लोकार्थ :** द्रव्ये नऊ असून त्यात पाच महाभूते, दिक्, काल मन व आत्मा या तत्त्वांचा समावेश होतो. गुणांची संख्या चोवीस असून त्यात शब्द–स्पर्श–रूप–रस–गंध (हे पाच समाविष्ट होतात.)



।।२२।।

**परिमाणञ्च सङ्ख्या च द्वौ संयोगवियोगकौ।**
**स्वभावतः पृथक्त्वञ्च गुरुत्वं द्रवता पुनः।।**

**श्लोकार्थ :** तसेच परिमाण, संख्या, संयोग व वियोग हे दोन स्वाभाविक गुण तसेच पृथक्त्व, गुरुत्व, द्रवता,.....





।।२३।।

**परत्वञ्चापरत्वञ्च स्नेहः संस्कार इत्यपि।**

**धीर्द्वेषसुखदुःखेच्छाधर्माधर्मप्रयत्नकाः।।**

**श्लोकार्थ :** परत्व आणि अपरत्व, स्नेह, संस्कार (हि देखिल समाविष्ट होतात.) बुद्धी, द्वेष, सुख, दुःख, इच्छा, धर्म, अधर्म, प्रयत्न हे चोविस गुण होत.



।।२४।।

**संस्कारस्त्रिविधो वेग इष्यादेर्गतिकारणम्।**

**दृष्टश्रुतानुभूतार्थस्मृतिहेतुश्च भावना।।**

**श्लोकार्थ :** संस्कार हा तीन प्रकारचा असतो. वेग हा गती प्रदान करतो जसे बाणाला धनुष्याने गती दिली जाते, भावनेच्या योगाने पाहिलेल्या, ऐकलेल्या व अनुभवलेल्या विषयांची स्मृति जागृत होते.



।।२५।।

**स्थितिस्थापकता नाम पूर्ववत् स्थितिकारणम्।**

**आकृष्टशाखाभूर्जादौ स्पष्टमेवोपलक्ष्यते।।**

**श्लोकार्थ :** स्थितिस्थापकत्वाच्या प्रभावाने पदार्थ आपल्या पूर्व अवस्थेला येतो. जसे झाडाची फांदी वा भूर्जपत्र वाकवून सोडून दिले तर ते आपल्या मूळ स्वरूपास प्राप्त होते हे प्रत्यक्ष दिसून येते.



।।२६।।

**उत्क्षेपणमवक्षेपः गमनं च प्रसारणम्।**

**आकुञ्चनमिति प्राहुः कर्मा पञ्चविधं बुधाः।।**

**श्लोकार्थ :** उत्क्षेपण, अवक्षेपण, गमन, प्रसारण व आकुंचन हे कर्माचे पाच प्रकार असल्याचे वैशेषिक शास्त्रज्ञ सांगतात.



।।२७।।

**सामान्यं द्विविधं प्रोक्तं परञ्चापरमेव च।**

**परं सत्तैव सर्वत्र तदनुस्यूतवर्तनम्।।**

**श्लोकार्थ :** सामान्य हे पर आणि अपर असे दोन प्रकारचे म्हटले आहे.

सार्वत्रिक अशी सर्व देश–काल व्यापक सत्ता हेच पर सामान्य असून सर्वत्र व्यापलेले असणे हाच त्याचा गुणधर्म आहे.



।।२८।।

**द्रव्यत्वगुणतेत्यादि सामान्यमपरं तथा।**
**विशेषाः स्युरनन्तास्ते व्यावृत्तिज्ञानहेतवः।।**

**श्लोकार्थ :** द्रव्यत्व, गुणता इ. सामान्ये अपर सामान्ये असून विशेष हे अनन्त आहेत व ते व्यावृत्तज्ञानास म्हणजेच पदार्थ वा वस्तूचा वेगळेपणा समजण्यास कारणीभूत ठरतात.



।।२९।।

**रूस्येव घटे नित्यः सम्बन्धः समवायकः।**
**कालाकाशदिगात्मानो नित्याश्च विभवश्च ते।।**

**श्लोकार्थ :** घटाशी त्याच्या रूपाचा (आकाराचा) जसा नित्य संबंध असतो तसा अपरिहार्य संबंध समवाय म्हणून ओळखला जातो. काल, आकाश, दिक् व आत्मा ही द्रव्ये नित्य आणि विभू व्यापक आहेत.



।।३०।।

**चतुर्विधाः परिच्छिन्नाः नित्याश्च परमाणवः।**
**इति वैशषिकमते पदार्थाः षट् प्रकीर्तिताः।।**

**श्लोकार्थ :** परमाणू हे पृथ्वी, आप, तेज व वायू असे चार प्रकारचे असून ते नित्य तसेच परिच्छिन्न असतात. अशा प्रकारे वैशेषिकांनी वर्णन केलेले सहा पदार्थ होत.



**साङ्ख्यपदार्थविभागः – सांख्य पदार्थांचा संक्षिप्त परिचय**

सांख्य पदार्थांचा संक्षिप्त परिचय स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।३१।।

**माया प्रधानमव्यक्तमविद्याऽ ज्ञानमक्षरम्।**
**अव्याकृतं च प्रकृतिः तम इत्यभिधीयते।।**

**श्लोकार्थ :** जगत्–प्रपंचाचे मूळ कारण असलेली मूल अव्याकृत प्रकृति अव्यक्त, अविद्या, अज्ञान, अक्षर, तम इत्यादी नावांनी ओळखली जाते.





।।३२।।

**मायायां ब्रह्मचैतन्यप्रतिबिम्बानुषङ्गतः।**
**महत्कालपुमांसः स्युः महत्तत्त्वादहंकृतिः।।**

**श्लोकार्थ :** मायेचे ठायी पडलेल्या ब्रह्म चैतन्याच्या प्रतिबिम्बाच्या अनुषंगाने महत्, काल व पुरुष ही तीन तत्त्वे उत्पन्न होतात. महत्तत्त्वापासून अहंकार उत्पन्न होतो.



।।३३।।

**तामसात् स्युरहङ्कारात् खानिलाग्नयम्बुभूमयः।**
**शब्दः स्पर्शश्च रुपञ्च रसो गन्धोऽप्यनुक्रमात्।।**

**श्लोकार्थ :** तामस अहंकारापासून आकाश, वायू, अग्नी (तेज), आप (जल) व भूमी (पृथ्वी) ही पाच तत्त्वे तसेच शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध ह्या तन्मात्रा (विषय) क्रमाने निर्माण होतात.



।।३४।।

**इन्द्रियाणाञ्च विषयाः भूतानामपि ते गुणाः।**
**देवाः सदाशिवश्चेशः रुद्रो विष्णुश्चतुर्मुखः।।**

**श्लोकार्थ :** त्याचप्रमाणे पाच ज्ञानेन्द्रिये, पाच कर्मेन्द्रिये व त्यांचे विषय आकाशादिक भूतांचे गुण तसेच सदाशिव, ईश, रुद्र, विष्णु व चतुर्मुख ब्रह्मदेव या अनुक्रमे आकाश, वायू, तेज, जल व पृथ्वी यांच्या अधिष्ठात्या देवता क्रमाने निर्माण होतात.



।।३५।।

**सात्त्विकात् स्यादहङ्कारादन्तःकरणधीन्द्रियम्।**
**मनो बुद्धिरहङ्कारश्चित्तं करणमान्तरम्।।**

**श्लोकार्थ :** सात्त्विक अहंकारापासून अंतःकरण, बुद्धी व ज्ञानेन्द्रिये निर्माण होतात. मन, बुद्धी, अहंकार व चित्त हेच अंतःकरण म्हणून ओळखले जाते.



।।३६।।

**संशयो निश्चयो गर्वः स्मरणं विषया अमी।**
**चन्द्रः प्रजापती रुद्रः क्षेत्रज्ञ इति देवताः।।**

**श्लोकार्थ :** संशय हा मनाचा, निश्चय हा बुद्धीचा, गर्व हा अहंकाराचा, स्मरण हा चित्ताचा गुण असून चन्द्र, प्रजापती, रुद्र व क्षेत्रज्ञ अशा या तत्त्वांच्या देवता आहेत.



।।३७।।

**श्रोत्रं त्वक् चक्षुषी जिह्वा घ्राणं ज्ञानेन्द्रियं विदुः।**
**दिग्वातसूर्यवरूणा नासत्यौ देवताः स्मृताः।।**

**श्लोकार्थ :** कान, त्वचा, डोळे, जिभ व नाक ही ज्ञानेन्द्रिये समजली जात असून दिशा वायू, सूर्य, वरूण व नासत्या (आश्विनीकुमार) या त्यांच्या देवता आहेत.



।।३८।।

**राजसात् स्युरहङ्कारात् कर्मेन्द्रियसमीरणाः।**
**कर्मेन्द्रियाणि वाक् पाणिः पादः पायुरुपस्थकम्।।**

**श्लोकार्थ :** राजस अहंकारापासून कर्मेन्द्रिये व प्राण निर्माण होतात. वाक् (वाणी), पाणी (हात), पाद (पाय), पायू (गुदा) व उपस्थ (जननेन्द्रिय) ही पाच कर्मेन्द्रिये होत.



।।३९।।

**वचनादानगमनविसर्गानन्दसंज्ञकाः।।**
**विषया देवतास्तेषां वह्नीन्द्रोपेन्द्रमृत्युकाः।।**

**श्लोकार्थ :** कर्मेन्द्रियांची अनुक्रमे वचन, आदान, गमन, उत्सर्जन व आनंद ही कार्ये असून अग्नी, इन्द्र, उपेन्द्र (विष्णु) व मृत्यू या अशा त्यांच्या देवता आहेत.



।।४०।।

**प्राणोऽपानः समानश्चोदानव्यानौ च वायवः।**
**भूतैस्तु पञ्चभिः प्राणैः चतुर्दशभिरिन्द्रियैः।।**

**श्लोकार्थ :** प्राण, अपान, समान, व्यान व उदान हे सर्व भूतमात्रांचे ठायी असणारे पाच वायू असून इन्द्रियांची संख्या चौदा आहे.



।।४१।।

**चतुर्विंशतितत्त्वानि साङ्ख्यशास्त्रविदो विदु :।**

**श्लोकार्थ :** अशा प्रकारे चोविस तत्त्वे असल्याचे सांख्यशास्त्र जाणणाऱ्या विद्वानांनी प्रतिपादन केले आहे.

पू. सुरेश्वराचार्यांनी सांख्यतत्त्वे स्पष्ट करताना ज्या देवता सांगितल्या आहेत; त्यांचा उल्लेख ईश्वरकृष्णाच्या सांख्यकारिकेत नाही.

**पौराणिकतत्त्वव्यवस्था – पौराणिक तत्त्वांचे निरूपण**

पुढील श्लोकाने पौराणिक सिद्धांतातील तत्त्व निरूपण करण्यात आले आहे.

**महान् कालः प्रधानञ्च मायाऽविद्ये च पूरुषः।।**

**श्लोकार्थ :** पौराणिकांच्या मतानुसार, महत्, काल, प्रधान, माया व अविद्या तसेच पुरुष ही तत्त्वे देखील स्वीकारली असून....



।।४२।।

**इति पौराणिकाः प्राहुः त्रिंशत्तत्त्वानि तैस्सह।**

**श्लोकार्थ :** ..... अशा प्रकारे ही गणना तीस तत्त्वांची होते.

**शैवतत्त्वव्यवस्था – शैवागममताचे तत्त्व निरूपण**

पुढील श्लोकाने शैवागम सिद्धांतातील तत्त्व निरूपण करण्यात आले आहे.

**बिन्दुनादौ शक्तिशिवौ शान्तातीतौ ततः परम्।।**

**श्लोकार्थ :** शैवागम विशारद विद्वानांच्या मतानुसार बिन्दू आणि नाद, शक्ति आणि शिव, शान्त आणि अतीत.....



।।४३।।

**षट्त्रिंशत्तत्त्वमित्युक्तं शैवागमविशारदैः।**

**श्लोकार्थ :** अशी आणखी सहा तत्त्वे मानली असून ती गृहीत धरता तत्त्वांची एकूण संख्या छत्तीस होते.

**'बीजास्यान्तरिवे' त्यादिव्याख्या – बीजास्यान्तरिवे – इ. पदाची व्याख्या**

येथून पुढील श्लोकांनी मूळ श्लोकातील 'बीजास्यान्तरिवे' इत्यादी पदाचे निरूपण करण्यात आले आहे.

**सर्वे विकल्पाः प्रागासन् बीजेऽङ्कुर इवात्मनि।।**

बीजाचे ठायी अंकुर जसा सूक्ष्मरूपात अस्तित्वात असतो तसेच हे सर्व

विकल्प मूळारंभी परमात्मस्वरूपाचे ठायी अस्तित्वात असतात.



।।४४।।

**इच्छाज्ञानक्रियारूपमायया ते विजृम्भिताः।**

**इच्छाज्ञानक्रियापूर्वाः यस्मात् सर्वाः प्रवृत्तयः।।**

**श्लोकार्थ :** इच्छा–ज्ञान–क्रिया शक्तिरूप मायेच्या प्रभावाने ते प्रकट होतात. विश्वातील सर्व प्रवृत्ति इच्छाशक्ती ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती यांच्या साहाय्यानेच प्रवर्तित होत असते.



।।४५।।

**सर्वेऽपि जन्तवः तस्मात् ईश्वरा इति निश्चिताः।**

**श्लोकार्थ :** सर्व प्राणिमात्र ईश्वरस्वरूप आहेत हाच निष्कर्ष यातून सिद्ध होतो.

**'महायोगीव' इत्यस्यार्थः – महायोगीव इ. पदाची व्याख्या**

येथून पुढील श्लोकांनी मूळ श्लोकातील 'महायोगीव' इत्यादी पदाचे निरूपण करण्यात आले आहे.

**बीजाद् वृक्षः तरोर्बीजं पारम्पर्येण जायते।।**

**श्लोकार्थ :** बीजापासून वृक्ष निर्माण होतो आणि त्याच वृक्षापासून पुनः बीज उत्पन्न होते अशी ही बीज–वृक्ष ही परंपरा सातत्याने चालत राहते.



।।४६।।

**इतिशङ्कानिवृत्त्यर्थं योगिदृष्टान्तकीर्तनम्।**

**विश्वामित्रादयः पूर्वे परिपक्वसमाधयः।।**

**श्लोकार्थ :** या शंकेच्या निवृत्तिसाठी योगीजनांचा दृष्टांत सांगितला जातो. जसे पूर्वकाळी विश्वामित्रादिक ऋषींनी परिपक्व समाधी प्राप्त करून.....



।।४७।।

**उपादानोपकरणप्रयोजनविवर्जिताः।**

**स्वेच्छया ससृजुः स्वर्गं सर्वभोगोपबृंहितम्।।**

**श्लोकार्थ :** उपादान, उपकरण वा प्रयोजन या कशाचाही मदतीशिवाय केवळ स्वतःच्या इच्छाशक्तीच्या सामर्थ्यावर सर्व भोगांनी परिपूर्ण असा स्वर्ग

निर्माण केला होता.



**ईश्वरस्यान्यानपेक्षस्यैव जगत्स्त्रष्टृत्वम् – ईश्वराशिवाय इतर कोणिही जगताचा निर्माता नाही.**

येथून पुढील श्लोकांनी 'एका परमेश्वराशिवाय अन्य कोणाचेही ठायी जगताच्या निर्मितीची क्षमता नाही...' हे स्पष्ट करण्यात आले आहे.

।।४८।।

**ईश्वरोऽ नन्तशक्तित्वात् स्वतंत्रोऽन्यानपेक्षतः।**
**स्वेच्छामात्रेण सकलं सृजत्यवति हन्ति च।।**

**श्लोकार्थ :** परमेश्वर हा अनन्तशक्तीसंपन्न असून पूर्ण स्वतंत्र आहे. त्याला आपल्याहून वेगळ्या अशा कोणत्याही अन्य साधनांच्या मदतीची अपेक्षा नसते. तो या विश्वाची निर्मिती तसेच विनाश केवळ आपल्या इच्छामात्रे करून करीत असतो.



।।४९।।

**न कारकाणां व्यापारात् कर्ता स्यान्नित्य ईश्वरः।**
**नापि प्रमाणव्यापारात् ज्ञातासौ स्वप्रकाशकः।।**

**श्लोकार्थ :** परमेश्वराचे कर्तृत्व कोणत्याही कारणांच्या व्यापारावरून सिद्ध होत नाही. तसेच त्याचे ज्ञातृत्व देखील कोणत्याही प्रमाण व्यापारावरून सिद्ध होत नाही, कारण तो स्वप्रकाश आहे.



।।५०।।

**ज्ञातृत्वमपि कर्तृत्वं स्वातन्त्र्यं तस्य केवलम्।**
**या चेच्छाशक्तिवैचित्री सास्य स्वच्छन्दकारिता।।**

**श्लोकार्थ :** त्याचे ज्ञातृत्व आणि कर्तृत्व हे केवळ त्याच्या स्वातंत्र्यावर अवलंबून असते. त्याची इच्छाशक्ति ही पूर्णतः स्वच्छन्द आहे.



।।५१।।

**यया कर्तुं न वा कर्तुमन्यथाकर्तुमर्हति।**
**स्वतन्त्रामीश्वरेच्छां के परिच्छेत्तुमिहेशते।।**

**श्लोकार्थ :** त्याची ही स्वच्छन्द इच्छाशक्ति कर्तृम्–अकर्तृम् अन्यथा कर्तृम् अशी सर्वसमर्थ स्वतंत्र आहे. परमेश्वराच्या या स्वतंत्र इच्छाशक्तीचा विरोध

करण्याचे सामर्थ्य कोणा दार्शनिकात वा देवतेत आहे ?



।।५२।।

**श्रुतिश्च सोऽकामयतेतीच्छया सृष्टिमीशितुः।**
**तस्मादात्मन आकाशस्सम्भूत इति चाब्रवीत्।।**

**श्लोकार्थ :** श्रुतीने 'सोऽकामयत – त्याने इच्छा केली' असे म्हटले आहे. आणि त्या इच्छेतून या विश्वाची निर्मिती झाली असे परमेश्वराच्या इच्छाशक्तीतून आकाशादिक्रमाने सृष्टी निर्मितीचे वर्णन केले आहे.



**ईश्वरस्य निमित्तमात्रत्वनिरासः –ईश्वर हा केवळ निमित्तकारण नाही**

येथून पुढील श्लोकांनी ईश्वर हा केवळ निमित्तकारण असल्याच्या मताचे निराकरण करण्यात आले आहे.

।।५३।।

**निमित्तं चेद्भवेदस्य जगतः परमेश्वरः।**
**विकारित्वं विनाशित्वं भवेदस्य कुलालवत्।।**

**श्लोकार्थ :** परमेश्वर हे या जगताचे निमित्तकारण मात्र आहे असे म्हणावयाचे झाल्यास कुंभाराप्रमाणे तो विकारी व विनाशी आहे हे देखील मान्य करावे लागेल!



।।५४।।

**बुद्ध्यादयो नव गुणाः नित्या एवेश्वरस्य चेत्।**
**नित्येच्छावान् जगत्सृष्टौ प्रवर्तेतैव सर्वदा।।**

**श्लोकार्थ :** बुद्धी, संस्कार, सुख, दुःख, द्वेष, इच्छा, धर्म, अधर्म व प्रयत्न हे नऊ गुण ईश्वराचे ठायी नित्य असतात असे म्हणावयाचे झाल्यास तो नित्य इच्छावान राहून जगताचे नित्य प्रवर्तन करतो असे म्हणावे लागेल!



।।५५।।

**प्रवृत्त्युपरमाभावात् संसारो नैव नश्यति।**
**मोक्षोपदेशो व्यर्थः स्यादागमोऽपि निरर्थकः।।**

**श्लोकार्थ :** प्रवृत्तीचक्र कधीच थांबणार नाही असे म्हणावयाचे झाल्यास संसाराचा नाशही होणार नाही आणि असे म्हटल्यास मोक्षाचा उपदेश व्यर्थ ठरून सर्व शास्त्र निरर्थक ठरण्याचा प्रसंग उपस्थित होईल.





।।५६।।

**तस्मान् मायाविलासोऽयं जगत्कर्तृत्वमीशितुः।**
**बन्धमोक्षोपदेशादिव्यहारोऽपि मायया।।**

**श्लोकार्थ :** म्हणूनच हे जगत् हा मायेचा विलास असून परमेश्वराचे कर्तृत्व आहे हे सिद्ध होते. बन्ध आणि मोक्षाचा उपदेश हा व्यवहारही मायेचाच विलास आहे.



।।५७।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे द्वितीयोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचे अर्थ निरूपण करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्धाचा दुसरा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे द्वितीयोल्लासः।।**
**श्री मानसोल्लास ग्रंथाचा दुसरा उल्लास पूर्ण झाला.**
**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा द्वितीय उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



ß

# DeLe ceevemeeuueeme leIee³eeuueemeë

ceevemeeuueeme ûeLee®ee eIemeje Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील तिसऱ्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा तिसरा उल्लास. या भागात प्रामुख्याने भावांचे सत्त्वस्वरूप तसेच आत्मा आणि परमात्म्यातील औपाधिक भेदाचे निरूपण केले आहे. शिवाय उपनिषदातील महावाक्याच्या सहायाने तत्त्व निरूपण व पंचकोश सिद्धांत प्रस्तुत करण्यात आले आहेत.

या प्रकरणात आद्य श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथाच्या 'यस्यैव स्फुरणमिति'.., या तिसऱ्या श्लोकावरील प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत 'मानसोल्लास' नामक वार्तिक ग्रंथाचा तिसरा उल्लास प्रस्तुत करण्यात आला आहे.

**भावानांसत्त्वंकीदृशम् – भावाच्या सत्त्वस्वरूपा विषयी**

भावाच्या सत्त्वस्वरूपाविषयी निरूपण करीत वार्तिककार म्हणतात.

।।१।।

**सत्ता स्फुरत्ते भावेषु कुत आगत्य सङ्गते।**
**बिम्बादिदर्पणन्यायादित्थं पृच्छन् प्रबोध्यते।।**

**श्लोकार्थ :** आरशात प्रतिबिम्ब दिसावे तसे या विश्वातील पदार्थांमध्ये सत्तेचे स्फुरण कोठून येऊन उपस्थित होते? असा प्रश्न विचारला जाण्याची शक्यता गृहित धरत म्हणतात.



**इदमत्राकूतम् –**

हे कसे ते स्पष्ट करित म्हणतात...

।।२।।

**असत्कल्पेषु भावेषु जडेषु क्षणनाशिषु।**
**अस्तित्वञ्च प्रकाशत्वं नित्यात् सङ्क्रामतीश्वरात्।।**

**श्लोकार्थ :** प्रतिक्षण नाश पावणाऱ्या या अचेतन असत् भावरूप पदार्थांचे ठायी अस्तित्व आणि प्रकाशत्व हे नित्य ईश्वराद्वारेच संक्रमित होत असते.



पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील तिसरा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

।।३।।

**यस्यैव स्फुरणं सदात्मकमसत्कल्पार्थकं भासते**
**साक्षात्तत्त्वमसीति वेदवचसा यो बोधयत्याश्रितान्।**
**यत्साक्षात्करणाद्भवेन्न पुनरावृत्तिर्भवाम्भोनिधौ**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

ज्याचे सत् स्वरूपात्मक स्फुरण हेच असत् कल्पार्थक मिथ्या पदार्थांना प्रकाशित करते अशा परमार्थसत्स्वरूपाचा आपल्याला शरण आलेल्या शिष्याला 'तत्त्वमसि' इ. वैदिक महावाक्यांच्या सहाय्याने उपदेश करून त्यास ज्ञानप्रदान करणाऱ्या तसेच ज्याच्या साक्षात्काराने या संसार सागरात पुन: जन्म घेऊन परत यावे लागत नाही, अशा या सद्गुरू श्री दक्षिणामूर्तीस माझा नमस्कार असो.



।।३।।

**आत्मसत्तैव सत्तैषां भावानां न ततोऽधिका।**
**तथैव स्फुरणं चैषां नात्मस्फुरणतोऽधिकम्।।**

**श्लोकार्थ :** पदार्थांची भावात्मक सत्ता ही एका आत्मसत्तेच्या सत्तेहून यत्किंचितही जास्त नाही त्याचप्रमाणे त्यांचे स्फुरण हे देखील आत्मस्फुरणाहून जास्त नाही.



।।४।।

**ज्ञानानि बहुरूपाणि तेषाञ्च विषया अपि।**
**अहङ्कारेऽनुषज्यन्ते सूत्रे मणिगणा इव।।**

**श्लोकार्थ :** अनेक प्रकारचे ज्ञान आणि त्याचे विविध विषय हे सूत्राचे ठायी मणी ओवावे तसे अहंकाररूप चिदाभासात्मक अंत:करणाचे ठायी सूत्रबद्ध राहतात.



।।५।।

**प्रकाशाभिन्नमेवैतद्विश्वं सर्वस्य भासते।**
**लहरीबुद्‌बुदादीनां सलिलान्न पृथक् स्थितिः।।**

**श्लोकार्थ :** सर्वांच्या अनुभवास येणारे हे विश्व परमात्म सत्‌स्वरूपाच्या प्रकाशाहून अभिन्न असेच प्रतीत होत असते, पाण्यावरील तरंग वा बुडबुडे यांचे अस्तित्व पाण्याहून वेगळे असे स्वतंत्र नसते.



।।६।।

**जानामीत्येव यज्ज्ञानं भावानाविश्य वर्तते।**
**ज्ञातं मयेति तत् पश्चाद्विश्राम्यत्यन्तरात्मनि।।**

**श्लोकार्थ :** 'जानामि–मी हे जाणतो' असे जे ज्ञान भावस्वरूप पदार्थांना व्यापून राहते तेच ज्ञान त्यानंतर 'ज्ञातं मया– 'मी हे जाणले आहे' अशा जाणिवेत पर्यवसान पावून अंतरात्म्याचे ठायी राहते.



।।७।।

**घटादिकानि कार्याणि विश्राम्यन्ति मृदादिषु।**
**विश्वं प्रकाशाभिन्नत्वाद्विश्राम्येत् परमेश्वरे।।**

**श्लोकार्थ :** घटादिक कार्ये त्यांच्या मृत्तिकादिक कारणाचे ठायी जशी विश्राम

म्हणजे लय पावतात तसेच हे विश्व ज्ञानस्वरूप प्रकाशाहून वेगळे नसल्यामुळे परमेश्वराचे ठायी विश्राम म्हणजे लय पावत असते.



।।८।।

**स्वगतेनैव कालिम्ना दर्पणं मलिनं यथा।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः।।**

**श्लोकार्थ :** आपल्याच ठायी असलेल्या काळीम्याने आरसा जसा मलीन होतो तसेच अज्ञानाचे आवरण ज्ञानावर आले म्हणजे ते अज्ञानच जीवाला कर्मप्रवृत्त करून जन्ममृत्यूच्या चक्रात फिरत राहण्यास व तदनुषंगिक सुखदु:खानुभव घेण्यास भाग पाडते.



**जीवपरमात्मनोरौपाधिक एव भेदः - जीव-परमात्म्यातील औपाधिक भेद**

जीव आणि परमात्म्यातील औपाधिक भेद स्पष्ट करीत वार्तिककारांनी म्हटले आहे.....

।।९।।

**घटाकाशो महाकाशो घटोपाधिकृतो यथा।**
**देहोपाधिकृतो भेदःजीवात्मपरमात्मनोः।।**

**श्लोकार्थ :** घटाकाश आणि महाकाश हे भेद जसे 'घट' या उपाधीमुळे अस्तित्वात येतात. तसेच जीवात्मा आणि परमात्मा ह्यातील भेद देखील 'देह' या उपाधीमुळेच अस्तित्वात येतो.



**प्रत्यभिज्ञावन्महावाक्यार्थबोधः - महावाक्यातून प्रत्यभिज्ञेचा बोध**

महावाक्यातून होणारा प्रत्यभिज्ञेचा बोध स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।१०।।

**तत्त्वमस्यादिवाक्यैस्तु तयोरैक्यं प्रदर्श्यते।**
**सोऽयं पुरुष इत्युक्ते पुमानेको हि दृश्यते।।**

**श्लोकार्थ :** श्रुतीच्या 'तत्त्वमसि' इ. महावाक्यातून आत्मा आणि परमात्मा यांचे एकत्व प्रतिपादन करण्यात आले आहे. जसे 'तोच हा पुरुष आहे' असे म्हणताच एकाच मनुष्याची ओळख पटते, तसेच हे समजून घ्यावे.



**'तत्त्वमसि' इत्यत्र तत्त्वम्पदयोरर्थौ – तत् आणि त्वम् पदाचा अर्थ**

तत्त्वमसि महावाक्यातील तत् आणि त्वम् पदाचा अर्थ स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।११।।

**यज्जगत्कारणं तत्त्वं तत्पदार्थः स उच्यते।**
**देहादिभिः परिच्छिन्नो जीवस्तु त्वम्पदाभिधः।।**

**श्लोकार्थ :** जगत् प्रपंचाचे जे मूळ कारणरूप तत्त्व आहे ते 'तत्' या पदाच्या अर्थाने दर्शविण्यात आले आहे तर देहादिकांनी परिच्छिन्न असा जीव 'त्वम्' या पदाने अभिप्रेत आहे.



।।१२।।

**तद्देशकालावस्थादौ दृष्टः स इति कथ्यते।**
**तथैतद्देशकालादौ दृष्टोऽयमिति कीर्त्यते।।**

**श्लोकार्थ :** 'त्या' अमुक एका देश–काल–अवस्थेत पाहिलेल्या एखाद्या वस्तूचा निर्देश 'ती वस्तू अशी पाहिली होती' अशा शब्दात केला जातो तर, 'या' वर्तमान देश–काल–अवस्थेत तीच वस्तू पाहिली असता 'ही वस्तू अशी आहे' असा निर्देश केला जातो.



**वाक्यार्थः – महावाक्याचा अर्थ**

तत्त्वमसि महावाक्याचा अर्थ स्पष्ट करीत वार्तिककारांनी म्हटले आहे.

।।१३।।

**मुख्यं तदेतद्वैशिष्ट्यं विसृज्य पदयोर्द्वयोः।**
**पुंमात्रं लक्षयत्येकं यथा सोऽयं पुमान् वचः।।**

**श्लोकार्थ :** या प्रमाणे अशा निर्देशातून प्रतीत होणारा दोन वेगवेगळ्या देश–काल–अवस्थातील भेद कांहीसा बाजूला ठेवला तर त्या दोन्ही वाक्यातून एकाच पुरुषाचा निर्देश करण्यात येतो 'तोच हा पुरुष आहे' या वाक्यातून हेच स्पष्ट होते.



'तत्त्वमसि' या महावाक्यातील प्रत्यभिज्ञेचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।१४।।

**प्रत्यक्त्वञ्च पराक्त्वञ्च त्यक्त्वा तत्त्वमसीति वाक्।**
**तथैव लक्षयत्यैक्यं जीवात्मपरमात्मनोः।।**

**श्लोकार्थ :** वर्तमानातील प्रत्यक्ष अपरोक्ष अनुभव आणि भूतकाळातील परोक्ष अनुभव यातील देश–काल–अवस्थांचा भेद वगळता एकाच पुरुषाचा जसा निर्देश होतो तसेच 'तत्त्वमसि' या वाक्यातून जीवात्मा आणि परमात्मा यांचे ऐक्य प्रतिपादन करण्याचे उद्दिष्ट आहे हे स्पष्ट होते.



**पदतदर्थसम्बन्धः – पदाचा अर्थाशी संबंध**

पदाचा अर्थाशी असलेला संबंध स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१५।।

**सामानाधिकरण्याख्यः सम्बन्धः पदयोरिह।**
**विशेषणविशेष्यत्वं सम्बन्धः स्यात् पदार्थयोः।।**

**श्लोकार्थ :** प्रस्तुत पदांचा समान विभक्तीमुळे परस्पर समानाधिकरणाने सम्बन्ध आहे, तर पदाच्या अर्थाचा म्हणजे पदाने अभिप्रेत वस्तूंचा त्या पदाशी विशेषण–विशेष्य संबंध आहे.



**लक्षणा – लक्षणेचा अर्थ**

लक्षणेचा अर्थ स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।१६।।

**लक्ष्यलक्षणसंयोगाद्वाक्यमैक्यञ्च बोधयेत्।**
**गङ्गायां घोष इतिवन्न जहल्लक्षणा भवेत्।।**

**श्लोकार्थ :** वाक्य हे लक्ष्य–लक्षण संबंधाने एकत्वाचा बोध करविते 'गंगायाम् घोषः म्हणजे गंगेच्या घोषासारखा' या वाक्यासारखी जहल्लक्षणा येथे असू शकत नाही.....



।।१७।।

**नाजहल्लक्षणापि स्याच्छ्वेतो धावति वाक्यवत्।**

**श्लोकार्थ :** ..... तसेच 'श्वेतो धावति– पांढरा (घोडा) धावत आहे' या वाक्यासारखी अजहल्लक्षणाही असू शकत नाही.

**तत्त्वमस्यादिवाक्यानां लक्षणा भागलक्षणा।।**

**श्लोकार्थ :** तत्त्वमसि इत्यादि वाक्यातील लक्षणा ही भागलक्षणा असते.



**।।१८।।**

**सोऽयं पुरुष इत्यादिवाक्यानामिव कीर्तिता ।**
**भिन्नवृत्तिनिमित्तानां शब्दानामेकवस्तुनि।।**

**श्लोकार्थ :** जसे 'तोच हा पुरुष आहे' इ. वाक्यातून स्पष्ट होते. प्रस्तुत भिन्नभिन्न प्रवृत्तिचे निमित्त असलेल्या वेगवेगळ्या शब्दाची.....



**।।१९।।**

**प्रवृत्तिस्तु समानाधिकरणत्वमिहोच्यते।**

**श्लोकार्थ :** ..... एका पदार्थाचे ठायी प्रवृत्ती दर्शविणे यासच सामानाधिकरण असे म्हटले आहे.

**जीवोनांशो न विकारो वा – जीव हा अंशही नाही आणि विकारही नाही**

जीव हा परमात्म्याचा अंशही नाही आणि विकारही नाही हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

**परस्यांशो विकारो वा जीवो वाक्येन नोच्यते।।**

**श्लोकार्थ :** जीव हा परमात्म्याचा अंश वा विकार आहे असे म्हणता येत नाही.



**।।२०।।**

**जीवात्मना प्रविष्टत्वात् स्वमायासृष्टमूर्तिषु।**
**निरंशो निर्विकारोऽ सौ श्रुत्या युक्त्या च गम्यते।।**

**श्लोकार्थ :** ..... कारण परमात्मतत्त्व हे आपल्या मायेने निर्माण केलेल्या मूर्तिचे ठायी जीवात्मभावाने प्रविष्ट झालेले आहे. परमार्थतत्त्व हे निरंश व निर्विकार आहे असे श्रुती आणि तर्क यावरून स्पष्ट होते.



**।।२१।।**

**घटाकाशो विकारो वा नांशो वा वियतो यथा।**

**श्लोकार्थ :** घटाकाशामुळे सर्व व्यापक आकाशाचा नाश होत नाही वा ते विकारही पावत नाही.

**महावाक्यानामर्थान्तरतानिरासः - महावाक्याच्या अर्थाबाबतचा संशय**

महावाक्याविषयीच्या अर्थाबाबतचा संशय निराकरण करीत वार्तिककारांनी म्हटले आहे....

**त्वमिन्द्रोऽसीतिवद्वाक्यं न खलु स्तुतितत्परम्।।**

**श्लोकार्थ :** 'तू इन्द्र आहेस' अशा प्रकारच्या स्तुतिपरक वाक्यासारखे हे (तत्त्वमसि इ.) वाक्य नाही....



।।२२।।

**न सादृश्यपरं वाक्यमग्निर्माणवकादिवत्।**
**न कार्यकारणत्वस्य साधनं मृद्घटादिवत्।।**

**श्लोकार्थ :** अथवा 'हे मूल अग्नीसारखे तेजस्वी आहे' असे सादृश्य स्पष्ट करणारेही नाही अथवा माती आणि घट यातील संबंधासारखा कार्यकारणभावही साधन रूपाने (सामानाधिकरणा सारखा) त्यातून प्रतीत होत नाही.



।।२३।।

**न जातिव्यक्तिगमकं गौः खण्ड इतिवद्वचः।**
**गुणगुण्यात्मकं वाक्यं नैतन्नीलोत्पलादिवत्।।**

**श्लोकार्थ :** 'गाय लंगडी आहे' इ. वचनासारखे हे वाक्य जाति-व्यक्ति प्रदर्शित करणारेही नाही, तसेच 'निळे कमळ' या पदातून जसा गुण-गुणी संबंध प्रतीत होतो तसाही या वाक्यातून प्रतीत होत नाही.



।।२४।।

**नोपासनापरं वाक्यं प्रतिमास्वीशबुद्धिवत्।**
**न चौपचारिकं वाक्यं राजवद्राजपूरुषे।।**

**श्लोकार्थ :** हे वाक्य सगुणसाकार मूर्तीचे ठायी ईश्वरबुद्धी बाळगण्याचा उपदेश करणारे उपासनापरक ही नाही, अथवा राजपुरुषाला राजासारखे समजणारे औपचारिक स्वरूपाचेही नाही.



**आत्मा - आत्मस्वरूप :**

आत्मस्वरूपाचे स्पष्टीकरण देत वार्तिककार म्हणतात....

।।२५।।

**जीवात्मना प्रविष्टोऽसावीश्वरः श्रूयते यतः।**

**देहेन्द्रियमनोबुद्धिप्राणाहङ्कारसंहतौ।।**

**श्लोकार्थ :** श्रुतीनेच हे प्रतिपादन केले आहे की देह-इन्द्रिये-मन-बुद्धी-प्राण व अहंकाराच्या या संघाताचे ठायी परमेश्वरच जीवात्मरूपाने प्रविष्ट झाला आहे.



याविषयी दृष्टांत देत वार्तिककार म्हणतात....

।।२६।।

**आत्मसङ्कलनादज्ञैरात्मत्वं प्रतिपाद्यते।**

**वह्निधीः काष्ठलोहादौ वह्निसङ्कलनादिव।।**

**श्लोकार्थ :** लाकूड अथवा लोखंडाचे ठायी अग्नी प्रविष्ट झाला असता अज्ञानी लोकांकडून ते लाकूड वा लोखंड हाच अग्नी आहे अशी बुद्धी बाळगली जाते तसेच देहाचे ठायी आत्मस्वरूप चैतन्याचा प्रवेश झाला असला तरी 'देह हाच चैतन्य आहे' असे अज्ञानी सामान्य जन म्हणत असतात.



अन्नमयकोशाच्या संदर्भातील आत्मसंकल्पना स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२७।।

**देहमन्नमयं कोशमाविश्यात्मा प्रकाशते।**

**स्थूलो बालः कृशः कृष्णो वर्णाश्रमविकल्पवान्।।**

**श्लोकार्थ :** देह हाच अन्नमयकोश असून त्यात आत्मतत्त्वच स्थूल, कृश, लहान-मोठा, काळा-गोरा इ. प्रकारे वर्णाश्रमभेदानुसार विकल्पवान् असल्यासारखे प्रकाशित होत असते.



प्राणमय कोशाच्या संदर्भातील आत्मसंकल्पना कशी अभिव्यक्त होते ते स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२८।।

**प्राणकोशेऽपि जीवामि क्षुधितोऽस्मि पिपासितः।**

**संशितो निश्चितो मन्य इति कोशे मनोमये।।**

**श्लोकार्थ :** प्राणमयकोशात तो आत्माच 'मी जीवित आहे,' 'मला भूक

लागली आहे', 'मला तहान लागली' आहे या भावनांतून प्रकाशित होत असतो, तर मनोमयकोशात तो आत्मा 'मी संशयात आहे', 'मी निश्चय करतो', 'मी मनन करतो' अशा प्रवृत्तींमधून प्रकाशित होत असतो.



विज्ञानमय व आनन्दमय कोशाचा संदर्भ देत वार्तिककार म्हणतात.....

।।२९।।

**विज्ञानमयकोशस्थो विजानामीति तिष्ठति।**
**आनन्दमयकोशाख्ये त्वहङ्कारे पुरा कृतैः।।**

**श्लोकार्थ :** विज्ञानमयकोशात प्रवेश केलेला तो आत्मा 'मी हे जाणतो' या संवेदनेने प्रतिष्ठीत राहतो तर आनंदमय कोशात तो अहंकार स्वरूपात राहून.....



।।३०।।

**पुण्यैरुपासनाभिश्च सुखितोऽस्मीति मोदते।**
**एवं कञ्चुकितः कोशैः कञ्चुकैरिव पञ्चभिः।।**

**श्लोकार्थ :** आपल्या पुण्यकर्माच्या व उपासनेच्या फल स्वरूप 'मी सुखी आहे' अशा भावनेतून आनंदी होत असतो. या प्रमाणे वस्त्राने शरीर झाकावे तशी आत्मस्वरूपाची ही जणू पांच कोशरूप वस्त्रेच आहेत.



पंचकोशांच्या आवरणामुळे आत्मस्वरूप परिच्छिन्न झाल्यासारखे भासते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।३१।।

**परिच्छिन्न इवाभाति व्याप्तोऽपि परमेश्वरः।**
**यथा सलिलमाविश्य बहुधा भाति भास्करः।।**

**श्लोकार्थ :** या वस्त्ररूपी कोशांना धारण केलेला तो सर्वव्यापक परमेश्वर परिच्छिन्न झाल्यासारखा प्रतिभासीत होत असतो, जसे सूर्याचे प्रतिबिम्ब पाण्यात पडून अनेक रूपात प्रतीत होत असते.



परमेश्वराचे तटस्थलक्षण स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।३२।।

**तथा शरीराण्याविश्य बहुधा स्फुरतीश्वरः।**
**कारणत्वञ्च कार्यत्वं तटस्थं लक्षणं तयोः।।**

**श्लोकार्थ :** त्याचप्रमाणे शरीररूपी पंचकोशात प्रविष्ट झालेला ईश्वरच अनेक भेदरूपात स्फुरण पावत असतो तो ईश्वर कारणरूप आहे तसेच कार्यरूप आहे हेच त्याचे तटस्थ लक्षण आहे.



परब्रह्माचे तटस्थलक्षण हे स्वरूपलक्षणच आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

**।।३३।।**

**शाखायां चन्द्र इतिवन्नैव मुख्यमिदं मतम्**

**महाप्रकाशमित्युक्तं स्वरूपं चन्द्रलक्षणम्।।**

**श्लोकार्थ :** हे तटस्थ लक्षण 'झाडात चन्द्र आहे' या लक्षणेसारखे नसून 'चन्द्र मोठा प्रकाशमान् आहे' या वचनातील चन्द्राचे प्रमुख प्रधान स्वरूपलक्षण आहे.



'तत्त्वमसि' हे महावाक्य परब्रह्माचे स्वरूपलक्षण दर्शविते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

**।।३४।।**

**सच्चिदानन्दरुपत्वं स्वरूपं लक्षणं तयोः।**

**एकलक्षणयोरैक्यं वाक्येन प्रतिपाद्यते।।**

**श्लोकार्थ :** सत्–चित्–आनन्द रूप हेच परमेश्वराचे स्वरूपलक्षण असून हे एकच लक्षण असलेल्या जीवाचे परमेश्वराशी असलेले ऐक्यच महावाक्यातून प्रतिपादन करण्यात आले आहे.



परब्रह्म परमेश्वर सर्वात्मक आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

**।।३५।।**

**तस्मादेकप्रकाशत्वं सर्वात्मत्वमिति स्थितम्।**

**देवतिर्यङ्मनुष्याणां प्रकाशान्न पृथक् स्थितीः।।**

**श्लोकार्थ :** याप्रमाणे एक प्रकाशस्वरूप परमेश्वरच सर्वात्मभावाने स्थित आहे, देव, तिर्यक् व मनुष्यांच्या स्वरूप प्रकाशात यत्किंचितही वेगळेपणा नाही.



जीव आणि परमेश्वर एकच असल्याचे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।३६।।

**जीवः प्रकाशाभिन्नत्वात् सर्वात्मेत्यभिधीयते।**
**एवं प्रकाशरूपत्वपरिज्ञाने दृढीकृते।।**

**श्लोकार्थ :** जीव हा प्रकाश स्वरूपाने परमेश्वराहून वेगळा नाही आणि तो परमेश्वरच या चराचर विश्वात सर्वात्मभावाने प्रकटला आहे या प्रतिपादनानुसार जीवाचे प्रकाश स्वरूपाचे ज्ञान दृढ झाले म्हणजे.....



**अंतिम ज्ञानावस्था :**

परब्रह्म परमेश्वराचे ज्ञान हे जन्म-मृत्यूचा फेरा चुकविते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।३७।।

**पुनरावृत्तिरहितं कैवल्यं पदमश्नुते।**
**सकृप्रसक्तमात्रेऽपि सर्वात्मत्वे दृढीकृते।।**

**श्लोकार्थ :** त्यास पुनरावृत्तिरहीत असे कैवल्यपद प्राप्त होते. अगदी योगायोगाने का होईना हा सर्वात्मभाव दृढ झाला तरी....



।।३८।।

**सर्वपापविनिर्मुक्तः शिवलोके महीयते।**
**सर्वात्मभावना यस्य परिपक्वा महात्मनः।।**
**संसारतारकः साक्षात् स एव परमेश्वरः।**

**श्लोकार्थ :** ..... तो (जीव) सर्वपापापासून मुक्त होऊन शिवलोकात प्रतिष्ठीत होतो. ज्या महात्म्या पुरुषाची ही सर्वात्म भावना परिपक्व दृढीकृत होते तो हा संसारसागर तरून जाऊन साक्षात् परमेश्वर स्वरूप होतो.



**उपसंहार :**

प्रकरणाचा उपसंहार करित वार्तिककार म्हणतात.....

।।३९।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे तृतीयोल्लाससंग्रहः।।३९।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थप्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्धाचा तिसरा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे तृतीयोल्लासः।।**
**श्री मानसोल्लास ग्रंथाचा तिसरा उल्लास पूर्ण झाला.**
**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा तृतीय उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



# ß

# DeLe ceevemeeuueeme ®eIeLeeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee ®eeLee Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील चौथ्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा चौथा उल्लास. या भागात प्रामुख्याने या जगतप्रपंचाच्या अस्तित्वाचा आधार परमेश्वरीसत्ता हाच असल्याचे स्पष्ट करीत शरीरातील षट्चक्रे व नाडी संस्थानाचे निरूपण प्रस्तुत करण्यात आले आहेत.

**वस्तुसत्ताया ईशसत्तातिरिक्ततायाः खण्डनम् – परमेश्वरीसत्ते व्यतिरिक्त अन्य वस्तुसत्तेचे खंडन**

परमेश्वरी सत्तेहून व्यतिरिक्त अशा वस्तुसत्तेचे खंडन प्रस्तुत करीत वार्तिककार म्हणतात.

।।१।।

**स्वतः सन्तः प्रकाशन्ते भावा घटपटादयः।**
**नेश्वरस्य समावेशादित्यस्योत्तरमुच्यते।।**

**श्लोकार्थ :** घट–पटादिक भावरूप पदार्थ हे स्वतः च्या सत्ता सामर्थ्यानेच प्रकाशित होत असतात परमेश्वराच्या त्यातील समावेशामुळे नव्हे असे जे प्रतिपादन केले जाते त्याचे निराकरण येथे प्रस्तुत करण्यात येत आहे.

❖❖❖

**अस्यायं भावः – याचा भाव असा**

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील चौथ्या श्लोकाचे स्पष्टीकरण देत वार्तिककार म्हणतात.....

।।२।।

**अहमित्यनुसन्धाता जानामीति न चेत् स्फुरेत्।**
**कास्य को वा प्रकाशेत जगच्च स्यात् सुषुप्तवत्।।**

**श्लोकार्थ :** 'मी हे जाणतो... मी ज्ञाता आहे हे!' अनुसंधान असणारा 'मी' हे स्फुरण जर नसेल तर कशाने काय प्रकाशित होणार ? हे संपूर्ण विश्व जणू सुषुप्तीत लय पावल्यासारखे होईल!

❖❖❖

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील चवथा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

॥४॥

**नानाछिद्रघटोदरस्थितमहादीपप्रभाभास्वरं**
**ज्ञानं यस्य तु चक्षुरादिकरणद्वारा बहिःस्पन्दते।**
**जानामीति तमेव भान्तमनुभात्येतत् समस्तं जगत्**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये॥**

**श्लोकार्थ**

अनेक छिद्रे असलेल्या घटात ठेवलेल्या मोठ्या दिव्याच्या तेजस्वीते सारखे ज्याचे प्रखर ज्ञान नाक-कान-डोळे इ. इन्द्रियांच्या माध्यमातून बाह्य विषयांकडे स्पंदन पावत असतो. ज्याच्या प्रकाशमान असण्यामुळेच हे संपूर्ण चराचर जगत् अनु-प्रकाशमान होत आहे हे मी जाणतो. त्या परमात्मस्वरूप श्री गुरू दक्षिणामूर्तीला माझा नमस्कार असो.



ईश्वरीसत्ता ही सदासर्वकाळ विद्यमान असते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

**।।३।।**

**प्रागूर्ध्वं चासतां सत्त्वं वर्तमानेऽपि न स्वतः।**
**तस्मादीशे स्थितं सत्त्वं प्रागूर्ध्वत्वविवर्जिते।।**

**श्लोकार्थ :** प्राक्–पूर्वकाळी अर्थात् भूतकाळात वा उर्ध्व–नंतर म्हणजे भविष्यकाळात ज्या वस्तूची सत्ता नसते वा असत् असते ते वर्तमानातही विद्यमान असू शकत नाही हे लक्षात घेता पूर्वोत्तर भूत–भविष्याच्या संकल्पना बाजूला ठेवून परमेश्वर हा सदा सर्वकाळ सत्स्वरूपात स्थित आहे हे मान्य करावे लागते.



अचेतन जडतत्त्व स्वयंप्रकाशित नसते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

**।।४।।**

**स्वयमेव प्रकाशेरन् जडाः यदि विनेश्वरम्।**
**सर्वं सर्वस्य भासेत न वा भासेत किञ्चन।।**

**श्लोकार्थ :** अचेतन जड पदार्थ ईश्वरीतत्त्वाशिवाय स्वतःचे स्वतःच प्रकाशित होतात असे म्हणावयाचे झाल्यास सर्वकांही सर्वांने प्रकाशित होईल अथवा कशानेही कांहीच प्रकाशित होणार नाही अशी अवस्था प्राप्त होईल.



अचेतन जडतत्त्व स्वयंप्रकाश असते हे मान्य केल्यास उपस्थित होणारे तर्कदोष स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

**।।५।।**

**तस्मात् सर्वज्ञमज्ञं वा जगत् स्यादेकरूपकम्।**
**तुल्ये स्वयंप्रकाशत्वे जडचेतनयोर्मिथः।।**

**श्लोकार्थ :** शिवाय अशा अवस्थेत हे संपूर्ण जगत् सर्वज्ञ वा अज्ञ अशा कोणत्या तरी एका प्रकारचे ठरून जड–चेतन हा भेदच मिथ्या ठरेल!



**।।६।।**

**तुल्यमेव प्रसज्येरन् ग्राह्यग्राहकतादयः।**
**इन्द्रियाणामनियमाच्चाक्षुषाः स्यू रसादयः।।**

**श्लोकार्थ :** तसेच ग्राह्य आणि ग्राहक हे एकसारखेच होऊन गेल्यामुळे इन्द्रियविषय संबंधाच्या नियमाचाच अभाव होऊन रसादिक विषय डोळ्यांनीही

अनुभवले जाऊ शकतील!



ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती समान महत्त्वाच्या असल्याचे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।७।।

**मलिनामलिनादर्शपश्चात्प्राग्भागतुल्ययोः।**
**क्रियाशक्तिज्ञानशक्त्योरन्तःकरणभागयोः।।**

**श्लोकार्थ :** आरशाचा मलीन असलेला म्हणजे लेप लावलेला मागचा भाग आणि अ-मलीन स्वच्छ असलेला समोरचा भाग यासारखेच अंत:करणाचे ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती हे भाग सारखेच महत्त्वाचे आहेत.



ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती ही परमेश्वराचेच स्फुरण आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।८।।

**प्रतिबिम्बे स्फुरन्नीशः कर्ता ज्ञातेति कथ्यते।**
**बुद्धिः सत्त्वगुणोत्कर्षात् निर्मलो दर्पणो यथा।।**

**श्लोकार्थ :** ज्ञान-क्रियाशक्ती युक्त आरशाचे ठायी पडलेल्या प्रतिबिम्बातून स्फुरण पावणारा परमेश्वरच कर्ता-ज्ञाता म्हणून ओळखला जातो. स्वच्छ आरशात जसे वस्तूचे प्रतिबिम्ब चांगले दिसून येते तसेच सत्त्वगुणसंपन्न बुद्धीचे ठायी....



।।९।।

**गृह्णाति विषयच्छायामात्मच्छायाऽ नुभावतः।**
**अन्तःकरणसम्बन्धाद् निखिलानीन्द्रियाण्यपि।।**

**श्लोकार्थ :** आत्मस्वरूपाचे प्रतिबिम्ब चांगल्याप्रकारे अनुभवता येते. सर्व इन्द्रिये आपापल्या विषयांचे ग्रहण प्रतिबिम्ब रूपात करतात ते अंत:करणाच्या सम्बन्धामुळेच.



**नाडीनां विवेचनम् - नाडी निरूपण**

मानवी शरीरातील नाडी संस्थानाचे निरूपण करीत वार्तिककार म्हणतात...

।।१०।।

**रथाङ्गनेमिवलये कीलिता इव कीलकाः।**
**नाड्योऽ न्तःकरणे स्यूताः जालसंस्यूतसूत्रवत्।।**

**श्लोकार्थ :** रथ चक्राच्या नेमी–केन्द्रस्थानी जसे त्याचे आरे जोडलेले असतात अंत:करणाचे ठायी सर्व नाड्या जाळ्यात जसे धागे गुंतलेले असतात तशा परस्पर गुंतलेल्या असतात.



नाडी संस्थानाचे कार्य स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।११।।

**ताभिस्तु गोलकान्ताभिः प्रसर्पन्ति स्फुलिङ्गवत्।**
**करणानि समस्तानि यथास्वं विषयं प्रति।।११।।**

**श्लोकार्थ :** इन्द्रिय गोलकांपर्यंत जाणाऱ्या त्या सर्व नाड्यांच्या माध्यमातूनच सर्व इन्द्रिये आपापल्या विषयांकडे विस्फुलिंगासारखी झेपावतात.



मूलाधार चक्राचे स्थान स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१२।।

**देहस्य मध्यमं स्थानं मूलाधारमितीर्यते।**
**गुदात्तु द्व्यङ्‌गुलादूर्ध्वं मेढ्रात्तु द्व्यङ्‌गुलादधः।।**

**श्लोकार्थ :** देहाच्या मध्यभागी असलेले स्थान हे 'मूलाधार' म्हणून ओळखले जाते, हे स्थान गुदेच्या दोन अंगुळे वर आणि मेढ्राच्या दोन अंगुळे खाली असते.



मूलाधार चक्र हेच कुंडलिनी महाशक्तीचे स्थान आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१३।।

**त्रिकोणोऽधोमुखाग्रश्च कन्यकायोनिसन्निभः।**
**यत्र कुण्डलिनी नाम परा शक्तिः प्रतिष्ठता।।**

**श्लोकार्थ :** या मूलाधार चक्राचे ठायी अधोमुखी त्रिकोणाच्या टोकासारखी कन्यकेच्या योनीसारखी कुण्डलिनी नामक पराशक्ती विद्यमान असते.



कुंडलिनी महाशक्तीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१४।।

**प्राणाग्निबिन्दुनादानां सावित्री सा सरस्वती।**
**मूलाधाराग्रकोणस्था सुषुम्ना ब्रह्मरन्ध्रगा।।**

**श्लोकार्थ :** ही कुंडलिनी महाशक्ती प्राण, अग्नी, बिन्दू व नाद यास प्रकट करणारी असून मूलाधाराच्या अग्रकोनाचे ठायी राहून ब्रह्मरंघ्रापर्यंत प्रवाहीत होणारी सुषुम्ना हीच सरस्वती आहे.



इडा, पिंगला व सुषुम्ना या नाड्यांचे स्पष्टीकरणे देत वार्तिककार म्हणतात.....

।।१५।।

**मूलेऽर्धच्छिन्नवंशाभा षडाधारसमन्विता।**
**तत्पार्श्वकोणयोर्जाते द्वे इडापिङ्गले स्थिते।।**

**श्लोकार्थ :** मूलाधाराच्या सूक्ष्म छिद्राचे ठायी अर्ध्या फाकलेल्या बांबूच्या तुकड्यासारखी षट्चक्राचा आधार असलेली सुषुम्ना नाडी आहे. या नाडीच्या दोन बाजूला असलेल्या कोनातून इडा व पिंगला या दोन नाड्या बाहेर पडतात.



मूलाधार चक्रापासून प्रवाहीत होणाऱ्या इतर नाड्यांचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१६।।

**नाडीचक्रमिति प्राहुः तस्मान् नाड्यः समुद्गताः।**
**गान्धारी हस्तिजिह्वा च नयनान्तं प्रधावतः।।**

**श्लोकार्थ :** मूलाधार चक्रापासून सर्व नाड्या उगम पावत असल्यामुळे यास 'नाडीचक्र' असेही म्हटले जाते. नाडीचक्रापासून उगम पावून गान्धारी व हस्तिजिह्वा या दोन नाड्या नासिकांपर्यंत जाऊन पुढे नेत्रकोणापर्यंत जातात.



मणिपूर चक्राचे स्थान त्यातून निघणाऱ्या नाड्यांचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१७।।

**नाडीचक्रेण संस्यूते नासिकान्तमुभे गते।**
**नाभिमण्डलमाश्रित्य कुक्कुटाण्डमिव स्थितम्।।**

**श्लोकार्थ :** कुकुट्टाण्डाच्या आकाराच्या नाभिमंडलात स्थित मणिपूर चक्रापासून बाहेर पडणाऱ्या





।।१८।।

**पूषा चालम्बुषा नाडी कर्णद्वयमुपाश्रिते।**
**नाडी शुक्लाह्वया तस्माद् भ्रूमध्यमुपसर्पति।।**

**श्लोकार्थ :** पूषा व अलम्बूषा या दोन नाड्या दोन कानापर्यंत जातात तसेच त्यापासून (मणिपूर चक्र) निघणारी शुक्ला नामक नाडी भ्रुमध्यापर्यंत जाते.



सरस्वती आणि विश्वोदरी या नाड्यांचे कार्य स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१९।।

**सरस्वत्याह्वया नाडी जिह्वान्ता वाक्प्रसारिणी।**
**नाडी विश्वोदरी नाम भुङ्क्तेऽन्नं सा चतुर्विधम्।।**

**श्लोकार्थ :** सरस्वती नामक नाडी जिह्वान्त–जिभेच्या मूळापर्यंत जात असून तीच वाणीचा प्रसार करते. तर विश्वोदरी नामक नाडी चार प्रकारच्या अन्नाचे सेवन करते.



पयस्विनी नामक नाडीचे कार्य स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२०।।

**पीत्वा पयस्विनी तोयं कण्ठस्था कुरुते क्षुतम्।**
**नाडीचक्रात् समुद्भूताः नाड्यः तिस्रस्त्वधोमुखाः।।**

**श्लोकार्थ :** कण्ठाचे ठायी असलेली पयस्विनी नाडी जलपान करीत असून शिंक उत्पन्न करीत असते. या नाडीचक्रापासून खालच्या बाजूस जाणाऱ्या तीन अधोमुख नाड्या प्रकट होतात.



अन्य नाड्यांचे कार्य स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२१।।

**राका शुक्लं सिनीवाली मूत्रं मुञ्चेत् कुहूर्मलम्।**
**भुक्तान्नरसमादाय शङ्खिनी धमनी पुनः।।**

**श्लोकार्थ :** यातील राका नामक नाडी विर्योत्सर्ग करते, सिनीवाली मूत्रोत्सर्ग करते तर कुहू मलोत्सर्ग करते. शंखिनी नामक धमनी नाडी खालेल्या अन्नाचा रस ग्रहण करते.



।।२२।।

**कपालकुहरं गत्वा मूर्ध्नि सञ्चिनुते सुधाम्।**
**शतञ्चैका च नाड्यः स्युः तासामेका शिरोगता।।**

**श्लोकार्थ :** ..... आणि कपाल कुहरात जाऊन मूर्धा म्हणजे मस्तकाच्या जागी अमृतसिंचन करीत असते. या सर्व एकशे एक नाड्या असून त्यापैकी एक नाडी मस्तकाकडे जाते.

याप्रमाणे वार्तिककारांनी नाडीसंस्थानाचे कार्य स्पष्ट केले आहे.



मुक्तीचे द्वार स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२३।।

**तयोर्ध्वमायन् मुक्तः स्यादिति वेदानुशासनम्।**
**यदा बुद्धिगतैः पुण्यैः प्रेरितेन्द्रियमार्गतः।।**

**श्लोकार्थ :** या नाडीच्या मार्गाने उर्ध्वगामी जाणारा मुक्त होतो असे वेदाचे अनुशासन आहे. जेंव्हा अंतःकरणातील पुण्यकर्माने प्रेरित झालेल्या इन्द्रियांच्या मार्गाने.....



जागृती अवस्थेचे निरूपण करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२४।।

**शब्दादीन् विषयान् भुङ्क्ते तदा जागरितं भवेत्।**
**संहृतेष्विन्द्रियेष्वेव जाग्रत्संस्कारजान् पुमान्।।**

**श्लोकार्थ :** ..... शब्दादिक विषयांचा जीव अनुभव घेतो तेंव्हा तो जागृत अवस्थेत येतो. सर्व इन्द्रिये आपापल्या स्थानी लय पावल्यानंतर जीव जागृत अवस्थेतील संस्कारातून उत्पन्न होणाऱ्या....



स्वप्नावस्थेचे निरूपण करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२५।।

**मानसान् विषयान् भुङ्क्ते स्वप्नावस्था तदा भवेत्।**
**मनसोऽप्युपसंहारः सुषुप्तिरिति कथ्यते।।**

**श्लोकार्थ :** ..... मानस विषयांचा भोग घेतो तेंव्हा ती अवस्था स्वप्नावस्था म्हणून ओळखली जाते. ज्या अवस्थेत मनाचाही उपसंहार होतो ती अवस्था सुषुप्ती म्हणून ओळखली जाते.





जागृती व स्वप्न या अवस्थेतील अनुभव मायिक असतात हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२६।।

**तस्मान् मायासमाच्छन्नः सन्मात्रो वर्तते पुमान्।**
**मूढो मत्तोऽज्ञ इत्येवं मायावेशात् प्रकाशते।।**

**श्लोकार्थ :** या प्रमाणे मायेने आच्छादिलेला सत् स्वरूप आत्मा या औपाधिक अवस्थांचा अनुभव घेत असल्यासारखे भासते. मी मूढ आहे; मत्त आहे, अज्ञानी आहे असे त्याला वाटते ते मायेच्या प्रभावाने.



सुषुप्तावस्थेचे निरूपण करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२७।।

**सुखमस्वाप्स्वमित्येवं प्रबोधसमये पुमान्।**
**सच्चिदानन्दरूपः सन् सम्यगेव प्रकाशते।।**

**श्लोकार्थ :** मी सुखपूर्वक झोपलो होतो असा सुषुप्तीचा अनुभव त्या पुरुषाला जागृत अवस्थेत पुनः येत असतो. अशाप्रकारे सत्-चित्-आनंद स्वरूप स्वसंवेद्य 'मी' प्रकाशित होत राहतो.



परमेश्वर हाच सर्व प्रकाशाचा आधार आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२८।।

**इत्थं जगत् समाविश्य भासमाने महेश्वरे।**
**सूर्यादयोऽपि भासन्ते किमुतान्ये घटादयः।।**

**श्लोकार्थ :** याप्रमाणे महेश्वराचा समावेश या जगताचे ठायी होताच हे संपूर्ण जगत् प्रकाशमान होऊ लागते, सूर्य-चंद्र देखील प्रकाशित होतात तर मग घटादिक अन्य पदार्थाविषयी काय सांगावे ?



।।२९।।

**तस्मात् सत्ता च भावानां ईश्वराश्रयणाश्रया।**
**सत्यं ज्ञानमनन्तं च श्रुत्या ब्रह्मोपदिश्यते।।**

**श्लोकार्थ :** यावरून हेच स्पष्ट होते की भावरूप पदार्थांची सत्ता ही केवळ ईश्वराश्रयाच्या आश्रयानेच असते. श्रुतीने ब्रह्माचा उपदेश सत्यम्-ज्ञानम्-अनन्तम्

अशा शब्दात केला आहे.



।।३०।।

**जाग्रत्स्वप्नोद्भवं सर्वमसत्यं जडमन्धवत्।**

**श्लोकार्थ :** जागृती आणि स्वप्न या अवस्थांतून जे कांही अनुभवास येते ते असत्य, जड व अंधकारमय आहे.

याप्रमाणे नाडीसंस्थान व अवस्थात्रय निरूपण येथे पूर्ण होते.



**जीवेश्वरब्रह्मविवेक - जीव-ईश्वर-ब्रह्म विवेक**

जीव, ईश्वर आणि ब्रह्म याचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**ईश्वरश्चाहमित्येवं भासते सर्वजन्तुषु।।**

**श्लोकार्थ :** सर्व जीवमात्रांना 'मी आहे' या स्वरूपात ईश्वरच प्रतीत होत असतो.



।।३१।।

**निर्विकल्पश्च शुद्धश्च मलिनश्चेत्यहं त्रिधा।**
**निर्विकल्पं परं ब्रह्म निर्धूताखिलकल्पनम्।।**

**श्लोकार्थ :** 'मी निर्विकल्प आहे' 'मी शुद्ध आहे' 'मी मलीन आहे' अशा प्रकारे अहम्ची प्रतीति येत असते. सर्व किल्बिषांचा नाश झाल्यावर 'मी निर्विकल्प परब्रह्म आहे' अशी प्रतीति येत राहते. परब्रह्माची जाणिव सर्व कल्पनांपासून पूर्णपणे मुक्त अशी निर्विकल्प असते.



।।३२।।

**धूल्यन्धकारधूमाग्रनिर्मुक्तगगनोपमम्।**
**विवेकसमये शुद्धं देहादीनां व्यपोहनात्।।**

**श्लोकार्थ :** धूळ, अंधकार, धुर, आभाळ यासारख्या आवरणापासून मुक्त अशा निर्मळ आकाशासारखी! विवेक जागृत असताना देहादिकापासून बुद्धी दूर झाल्यामुळे परमेश्वर स्वरूपाचे शुद्ध दर्शन घडते.



।।३३।।

**यथाऽन्तरिक्षं संक्षिप्तनक्षत्रैः किञ्चिदीक्ष्यते।**
**देहेन्द्रियादिसंसर्गात् मलिनं कलुषीकृतम्।।**

**श्लोकार्थ :** जसे आकाशात इतस्ततः विखुरलेल्या ताऱ्यांच्या प्रकाशात आकाश दिसून येते. देह आणि इन्द्रियांच्या संसर्गाने मलीन व कलुषित झालेले आत्मस्वरूप.....



।।३४।।

**यथाकाशं तमोरूढं स्फुरत्यनवकाशवत्।**
**अहिमित्यैश्वरं भावं यदा जीवः प्रबुध्यते।।**

**श्लोकार्थ :** ..... हे अंधकाराने झाकलेले आकाश जसे अवकाशासारखे दिसून येत नाही तसे असते. जीवाचे ठायी जेंव्हा 'मी ईश्वर आहे' असा दिव्यभाव प्रकट होतो....



।।३५।।

**सर्वज्ञः सर्वकर्ता च तदा जीवो भविष्यति।**
**माययाऽधिकसम्मूढो विद्ययेशः प्रकाशते।।**

**श्लोकार्थ :** तेंव्हा 'मी सर्वज्ञ आहे' 'मी सर्वाचा कर्ता आहे' अशी जीवाची भावना दृढ होते. मायेच्या प्रभावाने मूढ झालेला विद्येचा ईश्वर स्वरूपाने प्रकाशित होतो.



।।३६।।

**निर्विकल्पानुसन्धाने सम्यगात्मा प्रकाशते।**
**अविद्याख्यतिरोधानव्यपाये परमेश्वरः।।**
**दक्षिणामूर्तिरूपोऽसौ स्वयमेव प्रकाशते।**

**श्लोकार्थ :** अशाप्रकारे आत्मस्वरूप महेश्वर निर्विकल्पाच्या अनुसन्धानाने सम्यक् प्रकारे प्रकाशित होतो. अविद्येचे आवरण लय पावले म्हणजे परमेश्वर..... दक्षिणामूर्तीच्या रूपात स्वतः प्रकाशमान स्वरूपात राहतो.



।।३७।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे चतुर्थोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबंधाचा चौथा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे चतुर्थोल्लासः।।**

**श्री सुरेश्वराचार्य कृत मानसोल्लासाचा चौथा उल्लास पूर्ण.**

**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा चतुर्थ उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



# ß

# DeLe ceevemeeuueeme Heáeceeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee Hee®eJee Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील पाचव्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा पाचवा उल्लास. या भागात प्रामुख्याने चार्वाकमताची स्थापना करून त्याचे खंडन प्रस्तुत करण्यात आले आहे.

**देहात्मवादीचार्वाकमतम् – देहात्मवादी चार्वाकमत**

देहात्मवादी म्हणजे 'देह हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाकमताची मांडणी पुढील श्लोकातून केली आहे.

।।१।।

**प्रमाणमेकं प्रत्यक्षं तत्त्वं भूतचतुष्टयम्।**
**मोक्षश्च मरणान्नान्यः कामार्थो पुरुषार्थकौ।।**

**श्लोकार्थ :** प्रत्यक्ष हेच एकमेव प्रमाण असून चार महाभूते (पृथ्वी, आप, तेज, वायू) हीच तत्त्वे आहेत. काम व अर्थ हेच दोन पुरुषार्थ असून मरणाशिवाय दुसरा मोक्ष नाही.

❖❖❖

।।२।।

**न हि खल्वीश्वरः कर्ता परलोककथा वृथा।**
**देहं विनास्ति चेदात्मा कुम्भवदृश्यतां पुरः।।**

**श्लोकार्थ :** या जगत्–प्रपंचाचा कर्ता ईश्वर नसून परलोवविषयक सर्व कथा मिथ्या आहेत. देहाशिवाय स्वतंत्र असा आत्मा जर अस्तित्वात असता तर तो घड्यासारखा वेगळा आपल्यासमोर दाखवता यावयास हवा.

❖❖❖

।।३।।

**ह्रस्वो दीर्घो युवा बाल इति देहोऽभिदृश्यते।**
**अस्ति जातः परिणतो वृद्धः क्षीणो जरन् मृतः।।**

**श्लोकार्थ :** लहान–मोठा, तरूण–बाल अशा देहभेदाने दिसून येणारा आत्मा जन्माला येतो आणि परिणाम पावत तो वृद्ध होऊन क्षीण जराजर्जर होत मृत्यू पावतो, हे आपण नेहमीच पाहतो.



❖❖❖

।।४।।

**इत्येवमुक्ताः षड्भावविकाराः देहसंश्रयाः।**
**वर्णाश्रमविभागश्च देहेष्वेव प्रतिष्ठितः।।**

**श्लोकार्थ :** याप्रमाणे सहा प्रकारचे भाव विकार (जन्म, मृत्यू...इ.) हे देहाच्या आश्रयाने असल्याचे म्हटले जाते. वर्ण आणि आश्रमाचे व्यवस्था विभागही देहाच्या आश्रयानेच प्रतिष्ठीत असतात.



।।५।।

**जातकर्मादिसंस्कारो देहस्यैव विधीयते।**
**शतं जीवेति देहस्य प्रयुञ्जन्त्याशिषं शुभाम्।।**

**श्लोकार्थ :** जातकर्मादिक संस्कारांचे विधानही देहासाठीच करण्यात येते 'शंभर वर्षे जगा!' अशा प्रकारचे आशिर्वाद दिले जातात ते ही देहाच्या संदर्भातच!



।।६।।

**इति प्रपञ्चं चार्वाको वाचयत्यल्पचेतनः।**

**श्लोकार्थ :** जगत् प्रपंचाची अशी निर्वाचना अल्प चेतन चार्वाक करीत असतो.



**प्राणात्मवादिचार्वाकमतम् – प्राणात्मवादी चार्वाकमत**

प्राणात्मवादी म्हणजे 'प्राण हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाकमताची मांडणी वार्तिककारांनी पुढील श्लोकातून केली आहे.

**केचिच्छ्वसिमि जीवामि क्षुधितोऽस्मि पिपासितः।।**

**श्लोकार्थ :** कित्येक विचारवंत असे प्रतिपादन करतात 'मी श्वासोच्छ्वास करतो' 'मी भूकेला आहे' 'मला तहान लागली आहे' 'मी जगतो'.....

।।७।।

**इत्यादिप्रत्ययबलात् प्राण आत्मेति मन्वते।**

**श्लोकार्थ :** इ. प्रत्ययांच्या सामर्थ्याने 'प्राण हाच आत्मा' हेच सिद्ध होते.



**इन्द्रियात्मवादि चार्वाकमतम् – इन्द्रियात्मवादी चार्वाकमत**

इन्द्रियात्मवादी म्हणजे 'इन्द्रिये हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाक मताची मांडणी वार्तिककारांनी पुढील श्लोकातून केली आहे.

**केचिच्छृणोमि पश्यामि जिघ्रामि स्पन्दयाम्यहम्।।**

**श्लोकार्थ :** कित्येक विचारवंत असे म्हणतात की, 'मी ऐकतो' 'मी पाहतो' 'मी वास घेतो' 'मी संवेदन करतो'.....



**।।८।।**

**इतीन्द्रियाणामात्मत्वं प्रतियन्ति ततोऽधिकम्।**

**श्लोकार्थ :** ..... अशा प्रकारचे इन्द्रियांचे आत्मस्वरूप स्पष्ट होते. हा प्राणात्मवादा पलिकडील इन्द्रियात्मवाद होय.

**बुद्ध्यात्मवादि चार्वाकमतम् – बुद्ध्यात्मवादी चार्वाकमत**

बुद्ध्यात्मवादी म्हणजे 'बुद्धी हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाक मताची मांडणी वार्तिककारांनी पुढील श्लोकातून केली आहे.

**जानामिप्रत्ययबलाद्बुद्धिरित्यपरे जगुः।।**

**श्लोकार्थ :** अन्य कांही विचारवंत 'मी जाणतो' या प्रत्ययाच्या आधारे 'बुद्धी हाच आत्मा आहे' असे मत प्रतिपादन करीत असतात.



**देहात्मवादि चार्वाक मत खण्डनम् – देहात्मवादी चार्वाकमताचे खण्डन**

देहात्मवादी म्हणजे 'देह हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाकमताचे खंडन वार्तिककारांनी खालील श्लोकातून केले आहे.

**।।९।।**

**मायाव्यामूढचित्तानां तेषां दूषणमुच्यते।**

**श्लोकार्थ :** अज्ञानाने मूढ झालेल्या मोहग्रस्त चित्ताच्या विचारवंतांच्या या प्रतिपादनाचे खण्डन येथे करण्यात आले आहे.

**इदमस्य तात्पर्यम्**

या श्लोकाचे तात्पर्य असे......

**देहादीनां जडार्थानां पाषाणवदनात्मनाम्।।**

**श्लोकार्थ :** देहादिक जडपदार्थ हे दगडासारखे अचेतन व अनात्मरूप आहेत.



**।।१०।।**

**कथं भवेदहंभावः समावेशं विनेशितुः।**

**देहस्तावदयं नात्मा दृश्यत्वाज्जाड्यवत्ततः।।**

पूज्यपाद आद्य शंकराचार्यांच्या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील पाचवा श्लोक खालीलप्रमाणे आहे.....

।।५।।

**देहं प्राणमपीन्द्रियाण्यपि चलां बुद्धिं च शून्यं विदुः**
**स्त्रीबालान्धजडोपमास्त्वहमिति भ्रान्ता भृशं वादिनः।**
**मायाशक्तिविलासकल्पितमहाव्यामोहसंहारिणे**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्री दक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

स्त्रीया, बाल, अन्ध, जडमूढ असे भ्रान्त झालेले लोक देह, प्राण, इन्द्रिये, बुद्धी, क्षणिक-विज्ञान वा अभावाला देखील 'हा मी आहे' असे प्रतिपादन करीत असतात तशी स्वत:ची समजूत करून घेतात. मायाशक्तीच्या विलासात कल्पिलेल्या या महाव्यामोहाचे संहारक श्री गुरू दक्षिणामूर्तींना माझा नमस्कार असो.



**श्लोकार्थ :** हे लक्षात घेता त्याचे ठायी अहंभाव अर्थात् 'हा जड देह म्हणजे मी आहे' अशी भावना परमेश्वराचा त्यात प्रवेश झाला असल्याशिवाय कशी काय होऊ शकेल ? कारण देह हा जडासारखा दृश्यस्वरूप आहे.



।।११।।

**रूपादिमत्त्वात् सांशत्वाद्भौतिकत्वाच्च कुम्भवत्।**
**मूर्छासुषुप्तिमरणेष्वपि देहः प्रदृश्यते।।**

**श्लोकार्थ :** देह हा एखाद्या घटासारखा दृश्य असल्यामुळे, जड–अचेतन असल्यामुळे, रूपादिक गुणांनी युक्त असल्यामुळे, अंशात्मक असल्यामुळे पांच भौतिक असल्यामुळे तो आत्मस्वरूप आहे असे म्हणता येत नाही. मूर्च्छा, सुषुप्ती व मृत्यू या अवस्थेत शरीर जशाला तसे असल्याचे दिसून येते.



।।१२।।

**देहादिव्यतिरिक्तत्वात् तदात्मा न प्रतीयते।**
**यथा जगत्प्रवृत्तीनामादिकारणमंशुमान्।।**

**श्लोकार्थ :** तथापि आत्मतत्त्व मात्र देहाहून वेगळे असल्यामुळे ते अनुभवास येत नाही. या जगतातील प्रवृत्तिचे कारण अंशुमान् सूर्य हेच आहे तसेच आत्मतत्त्व प्रमा हेच या देहादिकाच्या प्रवृत्तिचे मुख्य कारण आहे.



।।१३।।

**पुमांस्तथैव देहादिप्रवृत्तौ कारणं परम्।**
**मम देहोऽयमित्येवं स्त्री बालोऽन्धश्च मन्यते।।**

**श्लोकार्थ :** 'हा माझा देह आहे' अशी प्रतीति अगदी बाल, स्त्रीया व अन्ध यांनाही येत असते 'मी देह आहे' असे कोणिच म्हणत नाही! देहादिकांच्या प्रवृत्ती मागील कारण परमेश्वर हेच आहे.



।।१४।।

**देहोऽहमिति नावैति कदाचिदपि कश्चन।**

**श्लोकार्थ :** अशा अवस्थेत देह हाच आत्मा आहे असे केंव्हाही कसे म्हणता येईल ?

**इन्द्रियात्मवादि चार्वाकमत खण्डनम् - इन्द्रियात्मवादी चार्वाकमताचे खण्डन**

इन्द्रियात्मवादी म्हणजे 'इन्द्रिये हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाक मताचे खंडन वार्तिककारांनी पुढील अर्धश्लोकातून केले आहे.

**इन्द्रियाण्यपि नात्मानः करणत्वात् प्रदीपवत्।।**

**श्लोकार्थ :** इन्द्रिये ही देखील एखाद्या दिव्यासारखी साधनरूप असल्यामुळे आत्मस्वरूप असू शकत नाहीत.



**।।१५।।**

**वीणावादनवत् श्रोत्रं शब्दग्रहणसाधनम्।**
**चक्षुस्तेजस्त्रितयवद्रूपग्रहणसाधनम्।।**

**श्लोकार्थ :** श्रोत्रेन्द्रिय (कान) हे वीणावादनासारखे शब्द ग्रहणाचे साधन आहे. चक्षु (डोळे) हे सूर्य-चन्द्र व अग्नी या सदाशिवांच्या तीन नेत्रासारखे रूप ग्रहणाचे साधन आहे.



**।।१६।।**

**गन्धस्य ग्राहकं घ्राणं पुष्पसम्पुटकादिवत्।**
**रसस्य ग्राहिका जिह्वा दधिक्षौद्रघृतादिवत्।।**

**श्लोकार्थ :** एखाद्या पुष्पसंपुटकासारखे घ्राण (नाक) हे गन्ध ग्रहणाचे साधन आहे. दही, तुप, मध इत्यादिकांचा रस ग्रहण करण्याचे जिभ हे एक साधन आहे.



**।।१७।।**

**इन्द्रियाणि न मे सन्ति मूकोऽस्मि बधिरोऽस्म्यहम्।**
**इत्याहुरिन्द्रियैर्हीना जनाः किं ते निरात्मकाः।।**

**श्लोकार्थ :** ही इन्द्रिये आत्मस्वरूप म्हणता येत नाहीत कारण बोलता न येणारा माणूस 'मी मुका आहे' असे म्हणतो. बहिरा माणूस 'मी बहिरा आहे' असे म्हणताना दिसून येतो. अशा अवस्थेत ती-ती इन्द्रिये नसलेली माणसे अनात्मरूप आत्महीन आहेत असे कसे म्हणता येईल ?



**प्राणात्मवादि चार्वाकमत खण्डनम् – प्राणात्मवादी चार्वाकमताचे खण्डन**

प्राणात्मवादी म्हणजे 'प्राण हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाक मताचे खंडन वार्तिककारांनी खालील श्लोकातून केले आहे.

।।१८।।

**प्राणोऽप्यात्मा न भवति ज्ञानाभावात् सुषुप्तिषु।**
**जाग्रत्स्वप्नोपभोगोत्थश्रमविच्छित्तिहेतवे।।**

**श्लोकार्थ :** सुषुप्ती अवस्थेत ज्ञानाचा अभावच प्रतीत होत असल्यामुळे 'प्राण हा आत्मा आहे' असे म्हणता येत नाही. जागृती, स्वप्न व उपभोग काळात होणारे परिश्रम कमी करण्याच्या हेतूने सुषुप्ती अवस्था प्राप्त होते.



।।१९।।

**सुषुप्तिं पुरुषे प्राप्ते शरीरमभिरक्षितुम्।**
**शेषकर्मोपभोगार्थं प्राणश्चरति केवलम्।।**

**श्लोकार्थ :** पुरुषाला सुषुप्तावस्था प्राप्त झाली असता या अवस्थेत शेष कर्माच्या उपभोगासाठी शरीर सुरक्षित ठेवण्यासाठी केवळ प्राणतत्त्व हे सक्रिय राहते. ते देखील केवळ शिल्लक कर्माच्या उपभोगासाठी–



।।२०।।

**प्राणस्य तत्र चैतन्यं करणोपरमे यदि।**
**प्राणे व्याप्रियमाणे तु करणोपरमः कथम्।।**

**श्लोकार्थ :** इन्द्रिय साधनांचा लय झाला असताना प्राणरूप चैतन्य असते असे म्हटले तरी प्राणक्रियावान् असताना इन्द्रियांचा लय कसा होऊ शकतो ?



।।२१।।

**सम्राजि हि रणोद्युक्ते विरमन्ति न सैनिकाः।**
**तस्मान्न करणस्वामी प्राणो भवितुमर्हति।।**

**श्लोकार्थ :** राजा हा स्वतः रणांगणात युद्ध प्रवृत्त झाला असताना सैनिक जसे शान्त बसून राहू शकत नाहीत तसेच इन्द्रियरूपी साधनांचा स्वामी प्राण सक्रिय असताना इन्द्रिये शान्त कशी असू शकतात ? तात्पर्य हेच की प्राण हा इन्द्रियांचा स्वामी आत्मस्वरूप आहे असे म्हणता येत नाही.





।।२२।।

**मनसः प्रेरके पुंसि विरते विरमन्त्यतः।**
**करणानि समस्तानि तेषां स्वामी ततः पुमान्।।**

**श्लोकार्थ :** तात्पर्य हेच की, मनाला प्रेरणा देणारा आत्मा विराम पावला म्हणजे इतर सर्व इन्द्रिये आपोआपच लय पावतात. म्हणून आत्मस्वरूप पुरुष हाच त्याचा स्वामी आहे असे म्हणावे लागते.



**बुद्ध्यात्मवादि चार्वाकमत खण्डनम् - बुद्ध्यात्मवादी चार्वाकमताचे खण्डन**

बुद्ध्यात्मवादी म्हणजे 'बुद्धी हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाक मताचे खंडन वार्तिककारांनी खालील श्लोकातून केले आहे.

।।२३।।

**बुद्धिस्तु क्षणिका वेद्या गमागमसमन्विता।**
**आत्मनः प्रतिबिम्बे तु भासिता भासयेज्जगत्।।**

**श्लोकार्थ :** बुद्धी ही क्षणिक विज्ञानाचा विषय असून ती सातत्याने उत्पन्न होते आणि नाश पावते. बुद्धीचे ठायी पडलेल्या आत्मस्वरूपाच्या प्रतिबिम्बामुळे ती स्वतः प्रकाशित होते व या जगतातील पदार्थांना प्रकाशित करीत असते.



।।२४।।

**आत्मन्युत्पद्यते बुद्धिरात्मन्येव प्रलीयते।**
**प्रागूर्ध्वं चासती बुद्धिः स्वयमेव न सिद्ध्यति।।**

**श्लोकार्थ :** बुद्धी आत्मस्वरूपाचे ठायी उत्पन्न होते आणि आत्मस्वरूपाचे ठायीच लय पावते प्रतीतिच्या पूर्वी आणि नंतर अस्तित्वात नसणाऱ्या बुद्धीचे स्वतःचे अस्तित्वच सिद्ध होत नाही!



।।२५।।

**ज्ञानाच्चेत्पूर्वपूर्वस्मादुत्तरोत्तरसम्भवः।**
**युगपद्बहुबुद्धित्वं प्रसज्येत क्षणे क्षणे।।**

**श्लोकार्थ :** पूर्व-पूर्व ज्ञानबुद्धीपासून जर उत्तर-उत्तर बुद्धी उत्पन्न होणे शक्य असते तर प्रत्येक क्षणाला एकाच वेळी अनेक प्रकारची बुद्धी उत्पन्न होण्याची शक्यता स्वीकारावी लागते.





।।२६।।

**बुद्ध्यन्तरं न जनयेन्नाशोत्तरमसत्त्वतः।**

**श्लोकार्थ :** शिवाय उत्पन्न झालेली बुद्धी नाश पावते असे म्हणावयाचे झाल्यास नाश पावणारी बुद्धी अभावरूप असल्यामुळे ती दुसऱ्या बुद्धीला उत्पन्न करते हे मान्य करता येत नाही.



**संघातात्मवादि चार्वाकमत खण्डनम् – संघात आत्मवादी चार्वाकमताचे खण्डन**

संघातात्मवादी म्हणजे 'संघात हाच आत्मा आहे' असे मानणाऱ्या चार्वाक मताचे खंडन वार्तिककारांनी खालील श्लोकातून केले आहे.....

**एषां सङ्घात आत्मा चेदेकदेशे पृथक्कृते।।**

**श्लोकार्थ :** या सर्वांचा संघात हाच आत्मा आहे असे म्हणावयाचे झाल्यास संघाताचा एखादा भाग वेगळा केला तर.....

।।२७।।

**न चैतन्यं प्रसज्येत सङ्घाताभावतस्तदा।**
**भिन्नदिग्गत्यभिप्रायो बहु चेत्तन्न पूजितम्।।**

**श्लोकार्थ :** ..... चैतन्य अस्तित्वात राहणार नाही. कारण एक अवयव वेगळा करताच संघाताचा अभाव होईल! प्रत्येक अवयव हा स्वतंत्र संघात असून चेतन आहे असे म्हणावयाचे झाल्यास ते ही तर्कसंगत ठरणार नाही! प्रत्येक अवयवाची प्रवृत्ति वेगळ्या दिशेने होण्याचा प्रसंग उपस्थित होईल ?



।।२८।।

**सद्यो भिन्नं भवेदेतन्निष्क्रियं वा भविष्यति।**

**श्लोकार्थ :** याप्रमाणे शरीर संघाताचे ठायी बहुचेतनत्त्व अनेक चैतन्ये आहेत असे मान्य करावयाचा प्रसंग उपस्थित होऊन प्रत्येक अवयवाची प्रवृत्ति वेगळ्या दिशेने होण्याचा प्रसंग उपस्थित होईल ? वा हे सर्व निष्क्रिय आहे असे म्हणावे लागेल.

**आत्मपरिमाणमाश्रित्य देहाद्यात्मत्वनिरासः – आत्म्याचे मोजमाप करणाऱ्या मताचे निराकरण**

आत्मपरिमाणवादी म्हणजे 'आत्म्याचे मोजमाप केले जाऊ शकते' या मताचे निराकरण वार्तिककारांनी या श्लोकातून केले आहे. असे मत जैनदर्शनाने स्वीकारले आहे.

**देहास्यान्तर्गतोऽप्यात्मा व्याप्त एवेति बुध्यते।।**

**श्लोकार्थ :** आत्मतत्त्व हे देहान्तर्गत असले तरी ते संपूर्ण शरीर व्यापून राहते असे मान्य करावे लागते.



।।२९।।

**अणुप्रमाणश्चेदेषः व्याप्नुयान्नाखिलं वपुः।**
**देहप्रमाणश्चेन्न स्याद्बालस्य स्थविरादिता।।**

**श्लोकार्थ :** आत्मतत्त्व हे अणुप्रमाण आहे, अणूसारखे सूक्ष्म आहे असे म्हणावयाचे झाल्यास ते संपूर्ण शरीर व्यापून असते असे म्हणता येणार नाही.आत्मतत्त्वाचे प्रमाण देहाच्या प्रमाणानुसार असते असे म्हणावयाचे झाल्यास बाल्य, तारूण्य, वार्धक्य इत्यादि देहाच्या अवस्था कशा होतात याची उपपत्ति लागणार नाही.



।।३०।।

**देहवत्परिणामी चेत्तद्वदेव विनङ्क्ष्यति।**
**कर्मणां परिणामेन क्रिमिहस्त्यादिमूर्तिषु।।**

**श्लोकार्थ :** शिवाय असे म्हणावयाचे झाल्यास आत्मा हा देहाप्रमाणेच परिणाम पावणारा आहे असे मान्य करावे लागेल. कर्माच्या प्रभावाने आत्मा हा कृमी, हत्ती इ. प्राण्यांच्या शरीररूपी मूर्तीच्या आकारास धारण करतो.



।।३१।।

**व्याप्तत्वात् प्रविशत्यात्मा घटादिष्वन्तरिक्षवत्।**
**परमाणुप्रमाणेऽपि मनसि प्रतिभासते।।**

**श्लोकार्थ :** आत्मा हा व्यापक असल्यामुळे आकाश जसे घटादिकाचा आकार धारण करते त्याप्रमाणे आत्मा हा शरीराचे ठायी प्रवेश करीत असतो. परमाणुहूनही सूक्ष्म परिमाण असणारा हा आत्मा मनाचे ठायी देखील प्रकाशित होतो. त्यामुळे मन हे चेतन असल्यासारखे वाटते.



।।३२।।

**स्वप्ने चराचरं विश्वमात्मन्येव प्रतिष्ठितम्।**
**देहादिष्वहमित्येवं भ्रमः संसारहेतुकः।।**

**श्लोकार्थ :** स्वप्नावस्थेतही तोच अनुभवास येत असतो. चराचर विश्व आत्मस्वरूपाच्या आश्रयानेच प्रतिष्ठीत आहे. याप्रमाणे देहादिकाचे ठायी प्रतीत होणारा 'मी हा देह आहे' असा भाव हाच संसारानुभवास कारणिभूत ठरणारा भ्रम आहे.



।।३३।।

**अन्तःप्रविष्टः शास्तेति मोक्षायोपादिशच्छ्रुतिः।**
**एवमेषा महामाया वादिनामपि मोहिनी।।**

**श्लोकार्थ :** श्रुतीने मोक्षप्राप्तीसाठी 'अन्तःप्रविष्ट– परमेश्वराने आत प्रवेश केला आहे' असा उपदेश दिला आहे. हे श्रुतीचे शासन आहे. अशाप्रकारे ही महामाया तत्त्वचिंतकांसही मोहात पाडणारी आहे.



।।३४।।

**यस्मात् साक्षात्कृते सद्यो लीयते च सदाशिवे।**
**देहेन्द्रियासुहीनाय मानदूरस्वरूपिणे।।**
**ज्ञानानन्दस्वरूपाय दक्षिणामूर्तये नमः।**

**श्लोकार्थ :** भगवान् सदाशिवाचा साक्षात्कार होताच ती तात्काळ लय पावते. देह, इन्द्रिय व प्राण यांच्या पलीकडे असलेल्या प्रमाणाच्या आवाक्या बाहेरील ज्ञानानन्दस्वरूप श्री दक्षिणामूर्तीस नमस्कार असो.



।।३५।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे पञ्चमोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री दक्षिणामूर्ति स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्ध ग्रंथाचा पाचवा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे पञ्चमोल्लासः।।**

**।। मानसोल्लासाचा पाचवा उल्लास पूर्ण झाला।।**

**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्तिस्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा पंचम उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**

⌘ ⌘ ⌘

ß

# DeLe ceevemeeuueeme <eÿeuueemeë

### ceevemeeuueeme ûeLee®ee meneJee Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील सहाव्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा सहावा उल्लास. या भागात प्रामुख्याने बौद्धमताची स्थापना करून त्याचे खंडन प्रस्तुत करण्यात आले आहे.

**सुषुप्तिविषयविवेचनम् – सुषुप्ति निरूपण**

जागृती, स्वप्न व सुषुप्ती यापैकी सुषुप्ती अवस्थेत चेतनजीवाची स्थिती कशी असते ते स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात......

।।१।।

**स्वप्ने विश्वं यथा तत्स्थं जाग्रत्यपि तथेति चेत्।**
**सुषुप्तौ कस्य किं भाति कः स्थायी तत्र चेतनः।।**

**श्लोकार्थ :** जागृत अवस्था तसेच स्वप्नावस्था यात अनुभवास येणारे हे विश्व परमेश्वराचे ठायी स्थित असल्याचे म्हटले आहे, हे मान्य करावयाचे झाल्यास सुषुप्तावस्थेत कोणास कोणाची प्रतीति होते. या अवस्थेत स्थायी स्वरूपात चेतन कोण असतो ?

**बौद्धमतोपस्थापनम् – बौद्धमत स्थापना**

तथागत भगवान् बुद्धाच्या सौगत मताची अंतिम सत्यविषयक भूमिका शून्यवादी आहे, बौद्धमताचा शून्यवाद स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२।।

**सर्वं च क्षणिकं शून्यं सर्वमेव स्वलक्षणम् ।**
**सङ्घातः परमाणूनां मह्यम्ब्वग्निसमीरणाः ।।**

**श्लोकार्थ :** सर्व कांही क्षणिक असून शून्य स्वरूप आहे. तसेच सर्वकांही स्वलक्षण आहे. पृथ्वी, आप, तेज आणि वायू यांच्या परमाणूंच्या संघाताहून वेगळे असे यात कांही नाही.



बौद्धमताच्या शून्यवादाला अनुसरणारा त्यांचा दुसरा सिद्धांत पंचस्कन्धाचा आहे. तो स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।३।।

**मनुष्यादिशरीराणि स्कन्धपञ्चकसंहितः।**
**स्कन्धाश्च रूपविज्ञानसंज्ञासंस्कारवेदनाः।।**

**श्लोकार्थ :** मनुष्य तसेच प्राणिमात्रांची शरीरे हा पांच स्कन्धांचा संघातरूप समुदाय मात्र असतो. रूप-स्कन्ध, विज्ञान-स्कंध, संज्ञा-स्कन्ध, संस्कार-स्कन्ध व वेदना-स्कन्ध हे ते पांच स्कन्ध होत.



पंचस्कन्धापैकी रूप-स्कन्ध आणि विज्ञान-स्कंध यांचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।४।।

**रूप्यन्त इति रूपाणि विषयाश्चेन्द्रियाण्यपि।**
**विषयेन्द्रिययोर्ज्ञानं विज्ञानस्कन्ध उच्यते ।।**

**श्लोकार्थ :** विषय आणि इन्द्रिये आपले रूप प्रकट करीत असतात म्हणून त्यातच 'रूप-स्कन्ध' असे म्हटले जाते. तर विषय व इन्द्रिये यांच्या संपर्कातून होणारे अनुभवात्मक ज्ञान हेच विज्ञान-स्कन्ध म्हणून ओळखले जाते.



स्कन्ध हि संकल्पना अधिक स्पष्ट करण्यासाठी संज्ञास्कन्धाचे निरूपण करीत वार्तिककार म्हणतात.....

।।५।।

**संज्ञागुणक्रियाजातिविशिष्टप्रत्ययात्मिका।**
**पञ्चधा कल्पना प्रोक्ता संज्ञास्कन्धस्य सौगतैः।।**

**श्लोकार्थ :** संज्ञा, गुण, क्रिया, जाति आणि विशिष्ट प्रत्ययात्मक नाम या पाच प्रकारच्या मानसिक कल्पना या संज्ञा-स्कन्ध असल्याचे सौगत-अनुयायांचे म्हणणे आहे.



।।६।।

**गवां गौरिति संज्ञोक्ता जातिर्गोत्वं तु गोगतम्।**
**गुणाःशुक्लादयस्तस्य गच्छत्याद्याः तथा क्रियाः।।**

**श्लोकार्थ :** गायीला 'गाय' अशा नावाने ओळखले जाते तथापि गायीचे ठायी असलेले गोत्व हे मात्र जातिस्वरूप असते. काळी-पांढरी हे त्या गायीचे गुण होत, तर जाणे-येणे इत्यादिक क्रिया होत.





।।७।।

**शृङ्गी चतुष्पाल्लाङ्गूली विशिष्टप्रत्ययो ह्यसौ।**
**एवं पञ्चविधा क्लृप्तिः संज्ञास्कन्ध इतीर्यते।।**

**श्लोकार्थ :** शिंगे असलेली, चार पाय असलेली, शेपूट असलेली हे त्या गायीचे विशिष्ट प्रत्यय होत, अशाप्रकारे पाच प्रकारची कल्पना ही संज्ञा–स्कन्ध म्हणून ओळखली जाते.



स्कन्ध हि संकल्पना अधिक स्पष्ट करण्यासाठी वेदना व संस्कार या स्कन्धांचे निरूपण करीत वार्तिककार म्हणतात.....

।।८।।

**रागाद्याः पुण्यपापे च संस्कारस्कन्ध उच्यते।**
**सुखं दुःखञ्च मोहश्च स्कन्धः स्याद्वेदनाह्वयः।।**

**श्लोकार्थ :** राग–द्वेषादिक प्रवृत्ति आणि पुण्य–पापादिक कर्मे हाच संस्कार स्कन्ध म्हणून ओळखला जातो तर सुख, दुःख आणि मोह हा वेदना स्कन्ध म्हणून ओळखला जातो.



या प्रमाणे पञ्चस्कन्धाशिवाय वेगळा असा कोणी आत्मा वा ईश्वर अस्तित्वात नाही ही बौद्ध संकल्पना स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।९।।

**पञ्चभ्य एव स्कन्धेभ्यो नान्य आत्मास्ति कश्चन।**
**न कश्चिदीश्वरः कर्ता स्वगतातिशयं जगत् ।।**

**श्लोकार्थ :** या पांच स्कन्धाशिवाय वेगळा असा कोणताही आत्मा नसतो, तसेच या जगताचा कर्ता असा परमेश्वरही कोणि नाही हे जगत् स्वयंनिर्मित असे 'स्वगत' आहे.



स्कन्ध हा संघात असून पूर्वक्षणातील स्कन्धापासून उत्तरक्षणातील स्कन्ध उत्पन्न होतो अशी बौद्धांची क्षणभंगवादी भूमिका आहे ती स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१०।।

**स्कन्धेभ्यः परमाणुभ्यः क्षणिकेभ्योऽभिजायते ।**
**पूर्वपूर्वक्षणादेव क्षणः स्यादुत्तरोत्तरः।।**

**श्लोकार्थ :** क्षणमात्र अस्तित्त्व असणाऱ्या परमाणूंचा समूह असलेल्या स्कन्धापासून हे जगत् प्रवर्तित होत राहते. पूर्व-पूर्व क्षणापासून उत्तरोत्तर क्षण उत्पन्न होत राहतात.



पूर्व-उत्तर क्षणाच्या सातत्याची शृंखला हीच नित्यतेचा भासमान प्रत्यय निर्माण करते. हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

**।।११।।**

**पूर्वस्मादेव हि ज्ञानाज्जायते ज्ञानमुत्तरम् ।**

**स एवायमिति ज्ञानं सेयं ज्वालेव विभ्रमः ।।**

**श्लोकार्थ :** पूर्व-पूर्व ज्ञानापासून उत्तर-उत्तर ज्ञान उत्पन्न होत जाते या सातत्यातूनच 'हे आहे' असे ज्ञान अग्नीच्या ज्वालेसारखे भ्रमरूप प्रतीति उत्पन्न करीत राहते.



या प्रमाणे बौद्धमताचा सारांश मांडत वार्तिककार म्हणतात.....

**।।१२।।**

**अस्ति भातीति धीर्भ्रान्तैरात्मानात्मसु कल्प्यते।**

**हानोपादानराहित्यादाकाशः किं प्रकाशते।।**

**श्लोकार्थ :** अशाप्रकारे भ्रान्त झालेले लोक बुद्धीच्या कल्पनेने आत्मा 'आहे' वा 'प्रतीत होतो' अशी मान्यता स्वीकारत असतात ग्रहण-त्यागादिकापासून मुक्त असे आकाश प्रकाशित होऊ शकत नाही.



**।।१३।।**

**इत्येवं बौद्धसिद्धान्ती भाषमाणो निषिद्ध्यते।**

**शून्यं चेज्जगतो हेतुः जगदेव न सिद्ध्यति ।।**

**श्लोकार्थ :** असा हा बौद्ध सिद्धांत जगताचे अस्तित्वच नाकारतो. जगताचे मूळ कारण शून्य स्वरूप असेल तर जगत्-प्रपंचाची सिद्धताच होणार नाही.



**बौद्धमतनिरासः - बौद्धमत निराकरण**

अशा प्रकारे मागील क्रमांक एक ते बारा या श्लोकात बौद्ध सिद्धांताचे जे प्रतिपादन करण्यात आले आहे, ते आत्मतत्त्वाचे अस्तित्त्व नाकारणारे आहे. बौद्धसिद्धान्ताचे निराकरण या श्लोकाद्वारे करण्यात आले आहे.

**अस्यायमाशयः – या श्लोकाचा आशय**

मूळ स्तोत्रातील वरील श्लोकाचा आशय स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१४।।

**घट : शून्यः पटः शून्य इति कैः प्रतिपाद्यते ।**
**नैव भासेत शून्यं चेज्जगन्नरविषाणवत् ।।**

**श्लोकार्थ :** 'घट शून्य आहे,' 'पट शून्य आहे' असे कोणि प्रतिपादन करील का? हे जगत् जर शून्य स्वरूप असते तर मनुष्याच्या शिंगासारखे ते अनुभवासच आले नसते!



।।१५।।

**वस्त्वर्थी किमुपादद्याद्भारार्तः किं परित्यजेत् ।**
**को विदध्यान्निषिद्ध्येद्वा शून्यत्वात् स्वस्य चात्मनः ।।**

**श्लोकार्थ :** जर हे जगत् शून्यच म्हणावयाचे झाले तर एखादी वस्तू प्राप्त करण्याची इच्छा असणाराने काय ग्रहण करावे ? अथवा ओझ्याने वाकलेल्या – आर्त माणसाने कोणते ओझे उतरवावे ? कशाचा त्याग करावा ? शिवाय आपले आत्मस्वरूपच शून्य आहे असे म्हणावयाचे झाल्यास एखाद्या सिद्धांताचे विधान (प्रतिपादन) वा निषेध (निराकरण) तरी कोण करणार ?



।।१६।।

**अवसीदेत् निराकृतं तस्मात् सर्वमिदं जगत्।**
**स्कन्धानां परमाणूनां न सङ्घातयिताऽस्ति चेत्।।**

**श्लोकार्थ :** आणि आत्मस्वरूपच नाही म्हटल्यास हे संपूर्ण चराचर जगत् निष्कारणच नाश पावले असे होईल ? परमाणू आणि स्कंधाचा संघात करविणारा चेतन आत्मा तरी कोठून अस्तित्वात असणार ?



।।१७।।

**सङ्घातो न विना हेतुं जडाः घटपटादयः।**
**महानुभावो भूयासमिति भ्रान्तश्च मन्यते ।।**

**श्लोकार्थ :** परमाणू आणि स्कंधाचा संघात करविणारा चेतन आत्मा अस्तित्वातच नसेल तर घट–पटादिक संघातरूप हे जड जगत् कोणताही हेतू असल्याशिवाय अस्तित्वात येऊच शकत नाही. मी महानुभाव होईन असे उद्दिष्ट

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील सहावा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

**।।६।।**

**राहुग्रस्तदिवाकरेन्दुसदृशो मायासमाच्छादनात्**
**सन्मात्रः करणोपसंहरणतो योऽभूत्सुषुप्तः पुमान्।**
**प्रागस्वाप्समिति प्रबोधसमये यः प्रत्यभिज्ञायते**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

राहूने ग्रासलेल्या सूर्य अथवा चन्द्राप्रमाणे मायेने आच्छादिलेला सत् स्वरूप पुरुषच सर्व इन्द्रिय-साधनांचा उपसंहार झाल्यानंतर सुषुप्तावस्थेत आपल्या स्वरूपात स्थित असतो. सुषुप्तीतून जागृतावस्थेत आल्यावर 'मी सुषुप्तावस्थेत होतो, तो आता जागृतावस्थेत आलो आहे' अशी प्रत्यभिज्ञा ज्या सत्-चित्-आनंद स्वरूप आत्मस्वरूपास होते त्या सद्गुरू श्री दक्षिणामूर्तीस नमस्कार असो.



बाळगतात ती त्यांची भ्रान्तीच म्हणावयाची का ?



**प्रत्यभिज्ञायाः भ्रान्तित्वस्वीकारे दोषाः – प्रत्यभिज्ञा मत भ्रान्त नाही**

प्रत्यभिज्ञा मताला पुष्टी देत वार्तिककार म्हणतात...

**।।१८।।**

**आत्मापलापको बौद्धः किमर्थं चरति व्रतम्।**
**प्रत्यभिज्ञा यदा भ्रान्तिः भोजनादि कथं भवेत्।।**

**श्लोकार्थ :** आत्मस्वरूपाचे अस्तित्व नाकारणारे बौद्धमतानुयायी व्रताचरण करतात ते कशासाठी ? आणि प्रत्यभिज्ञा ही भ्रान्ति आहे असे म्हणावयाचे झाल्यास भोजनादिक लोकव्यवहार देखील शक्य होणार नाहीत.



लोकव्यवहार हा देखील प्रत्यभिज्ञेवर अवलंबून असतो, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**।।१९।।**

**इष्टसाधनमेवैतदन्नं गतदिनान्नवत्।**
**इति निश्चित्य बालोऽपि भोजनादौ प्रवर्तते।।**

**श्लोकार्थ :** 'काल सेवन केलेल्या अन्नाप्रमाणेच आजचे हे अन्न देखील भूक भागविण्याचे इष्ट साधन आहे' अशा प्रत्यभिज्ञारूप निश्चयात्मक जाणिवेतूनच लहान मुले देखील भोजनादिक लोकव्यवहारास प्रवृत्त होत असतात.



आत्मस्वरूपाचे अर्थक्रियाकारित्व स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**।।२०।।**

**अवकाशप्रदातृत्वमाकाशार्थक्रिया यथा।**
**तथैवार्थक्रिया पुंसः कर्तृत्वज्ञातृतादिका।।**

**श्लोकार्थ :** अवकाश प्रदान करणे–जागा देणे हेच आकाशाचे अर्थक्रियाकारित्व आहे, त्याचप्रमाणे ज्ञातृत्व, कर्तृत्व इत्यादिक पुरुषाचे आत्मस्वरूप अर्थक्रिया कारित्व आहे.



सुषुप्ती म्हणजे गाढ झोपेच्यावेळी आत्मा हा कोणत्या स्वरूपात असतो हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२१।।

**सुषुप्तिसमयेऽप्यात्मा सत्यज्ञानसुखात्मकः।**
**सुखमस्वाप्समित्येवं प्रत्यभिज्ञायते यतः।।**

**श्लोकार्थ :** सुषुप्ती काळातही हा आत्मा सत्‌–स्वरूप ज्ञान–स्वरूप व सुखात्मक असतो. 'मी सुखाने झोपलो होतो' अशी प्रत्यभिज्ञा त्याचे ठायी जागृतावस्थेत सुषुप्तीची स्मृती विद्यमान असते.



आत्मस्वरूपाची ओळख ही स्वत:ची स्वत:ला पटणारी ओळख आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२२।।

**प्रत्यभिज्ञायत इति प्रयोगः कर्मकर्तरि।**
**आत्मा स्वयंप्रकाशत्वाज्जानात्यात्मानमात्मना।।**

**श्लोकार्थ :** 'प्रत्यभिज्ञा होते' हा वाक्यप्रयोग कर्म–कर्तरी आहे. आत्मा हा स्वयंप्रकाश असल्यामुळे आत्म्यानेच आत्म्याला जाणले जाते.



सुषुप्ती अवस्थेतही जाणिव असते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२३।।

**सुषुप्तौ मायया मूढो जडोऽन्ध इव लक्ष्यते।**
**अप्रकाशतया भाति स्वप्रकाशतयापि च ।।**

**श्लोकार्थ :** सुषुप्तावस्थेत असलेला आत्मा हा मायेच्या प्रभावाने अप्रकाश मूढ, जड, अन्ध असल्यासारखे प्रतीत होते. तथापि त्याची स्वयंप्रकाशित्वाची जाणिव देखील कायम असते.



जड शरीर हेच आत्मस्वरूप आहे असे मोहमयी मायेमुळे कसे वाटते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२४।।

**जडात्मनि च देहादौ साक्षादीशो विविच्यते।**
**एषैव मोहिनी नाम मायाशक्तिर्महेशितुः।।**

**श्लोकार्थ :** जड पदार्थ आणि भौतिक शरीर याहून साक्षात्‌ ईश्वरस्वरूप चेतन आत्मा वेगळा असल्याचे प्रतिपादन केले जाते हीच महेश्वराची मोहीनी नामक मायाशक्ती होय.





आत्मस्वरूप हे जागृति–स्वप्न–सुषुप्ती या तीन अवस्थाहून पूर्णपणे वेगळे आहे, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२५।।

**मोहापोहः प्रमातृणां मोक्ष इत्यभिधीयते।**
**अवस्थात्रयनिर्मुक्तो दोषादिभिरनाविलः।।**

**श्लोकार्थ :** प्रत्यगात्म्याच्या मोहाची निवृत्ति हाच मोक्ष म्हणून ओळखला जातो. मोक्षावस्था जागृति–स्वप्न–सुषुप्ती या तीन अवस्थांपासून पूर्णपणे वेगळी आणि दोषांनी कलंकीत नसलेली अशी असते.



आत्मस्वरूप हे अत्यंत सूक्ष्म आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२६।।

**इषीक इव सन्मात्रः न्यग्रोधकणिकोपमः।**
**बाह्याद्बाह्यदलोन्मुक्तकदलीकन्दसन्निभः।।**

**श्लोकार्थ :** आत्मस्वरूप हे गवताच्या पात्याच्या आतील इषिकेसारखे, वा वटवृक्षाच्या बीजातील सूक्ष्म कणिकेसारखे अथवा बाहेरील सर्व आवरणे काढून टाकलेल्या केळीच्या गाभ्यासारखे सूक्ष्मातिसूक्ष्म अंतःस्वरूप आहे.



परमेश्वराचे पूर्णत्व स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात....

।।२७।।

**निरंशो निर्विकारश्च निराभासो निरञ्जनः।**
**पुरुषः केवलःपूर्णः प्रोच्यते परमेश्वरः।।**

**श्लोकार्थ :** निरंश, निर्विकार, निराभास आणि निरंजन केवल चैतन्यघन आत्माच पूर्ण पुरुष परमेश्वर म्हणून ओळखला जातो.



या विषयी श्रुतिचा संदर्भ स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२८।।

**वाचो यत्र निवर्तन्ते मनो यत्र विलीयते।**
**एकीभवन्ति यत्रैव भूतानि भुवनानि च ।।**

**श्लोकार्थ :** ज्या परमतत्त्वाचे ठायी वाणी निवृत्त होते आणि जेथे मनाचा लय होतो तसेच सर्व भूतमात्र व सर्व लोक ज्याचे ठायी एकरूप होतात. असा परमार्थसत्स्वरूपाचा निर्देश श्रुतीने केला आहे.





सर्व तत्त्वे परमार्थतत्त्वाचे ठायी लय पावतात हे स्पष्ट करण्यासाठी अन्य श्रुतीवचनाचा उल्लेख करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२९।।

**समस्तानि च तत्त्वानि समुद्रे सिन्धवो यथा।**
**कश्शोकः तत्र को मोह एकत्वमनुपश्यतः।।**

**श्लोकार्थ :** समुद्राचे ठायी जशा सर्व नद्या लय पावतात तशी सर्व भूतमात्रे व सर्व लोक ज्या परमार्थतत्त्वाचे ठायी लय पावतात. त्या परमात्म्याची एकत्व पावल्यावर तेथे कशाचा शोक आणि कशाचा मोह.



सविकल्प आणि निर्वीकल्प अनुभूतीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।३०।।

**वाच्यवाचकरूपत्वात् सविकल्पोऽपि सन्नहम्।**
**देहादीनां व्यपोहेन सम्भवेन्निर्विकल्पकम् ।।**

**श्लोकार्थ :** वाच्य-वाचक रूपातून भेदात्मक प्रतीतिने अभिव्यक्त होणारा आत्मा सविकल्प असला तरी देहादिक उपाधी दूर केल्यानंतर तो निर्विकल्प स्वरूप होतो.



असत् व सत् अशा भावनांचे फळ स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।३१।।

**असन्नेव भवेद्विद्वानसद्ब्रह्मेति वेद चेत्।**
**अस्ति ब्रह्मेति चेद्वेद सन्तमेनं ततो विदुः।।**

**श्लोकार्थ :** 'ब्रह्म नाही' अशा भावेनेने उपासना करणारा साधक असत् स्वरूप होतो तर 'ब्रह्म आहे' अशा भावनेतून उपासना करणारा सत् स्वरूप होतो.



।।३२।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**

**प्रबन्धे मानसोल्लासे षष्ठोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्धाचा सहावा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे षष्ठोल्लासः।।**

**।।श्री सुरेश्वराचार्य विरचित् मानसोल्लासाचा सहावा उल्लास पूर्ण झाला।।**

**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा सहावा उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



ॐ

# DeLe ceevemeeuueeme mehIeceeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee meeIeJee Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील सातव्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा सातवा उल्लास. या भागात प्रामुख्याने प्रत्यभिज्ञामताची स्थापना करून इतर मतांचे खंडन प्रस्तुत करण्यात आले आहे.

**प्रत्यभिज्ञास्वरूपम् – प्रत्यभिज्ञेचे स्वरूप**

बाल्यादिष्वपि इत्यादी शब्दांनी सुरू होणाऱ्या श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राच्या सातव्या श्लोकाचे प.प. सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक खालीलप्रमाणे आहेत. यात सुरेश्वराचार्यांनी प्रत्यभिज्ञेचे स्वरूप स्पष्ट केले आहेत.

।।१।।

**प्रत्यभिज्ञाबलादात्मा स्थायी निर्धार्यते यदि।**
**का नाम प्रत्यभिज्ञैषा किं वा तस्याश्च कारणम्।।**

**श्लोकार्थ :** आत्म्याचे स्थायी नित्य स्वरूप प्रत्यभिज्ञेच्या आधारावर निर्धारीत केले जाते असे म्हणावयाचे झाल्यास या प्रत्यभिज्ञेचे स्वरूप काय ? तसेच त्या प्रत्यभिज्ञेचे कारण/हेतू काय ? हे स्पष्ट होणे आवश्यक ठरते.



प्रत्यभिज्ञेविषयी घेतली जाऊ शकणारी संभाव्य शंका स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२।।

**प्रत्यक्षादिप्रमाणेषु प्रत्यभिज्ञा न पठ्यते।**
**कथं तस्याः प्रमाणत्वमिति पृच्छन् प्रबोध्यते।।**

**श्लोकार्थ :** प्रत्यक्षादी प्रमाणाचे निरूपण करताना प्रत्यभिज्ञेचा उल्लेख केला जात नाही. अशा परिस्थितीत प्रत्यभिज्ञेचे प्रामाण्य कसे मान्य करावयाचे ? असा प्रश्न उपस्थित होण्याची शक्यता लक्षात घेत स्पष्टीकरण देण्यात येत आहे.



प्रत्यभिज्ञेचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील सातवा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

।।७।।

**बाल्यादिष्वपि जाग्रदादिषु तथा सर्वास्ववस्थास्वपि**
**व्यावृत्तास्वनुवर्तमानमहमित्यन्तस्स्फुरन्तं सदा।**
**स्वात्मानं प्रकटीकरोति भजतां यो मुद्रया भद्रया**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ।।**

**श्लोकार्थ :**

बाल्य, तारुण्य आणि वृद्धत्व या अवस्थांतून अथवा जागृति, स्वप्न व सुषुप्ती या सर्व अवस्थातून त्या अवस्थाभेदांचा वेगळेपणा बाजूला सारत 'अहम्–मी आहे' अशा नित्य अनुभूतीच्या स्वरूपात अस्तित्वात असणाऱ्या व अंतर्यामी स्फुरणाच्या रूपाने सदासर्वकाळ प्रतीत होणाऱ्या आपल्या आत्मस्वरूपाचा बोध करविणाऱ्या शुभ कल्याणकारक चिन्मुद्रा धारण करणाऱ्या श्री दक्षिणामूर्तीस माझा नमस्कार असो.



॥३॥

**भातस्य कस्यचित्पूर्वं भासमानस्य साम्प्रतम्।**
**सोऽयमित्यनुसन्धानं प्रत्यभिज्ञानमुच्यते॥**

**श्लोकार्थ :** पूर्वी अनुभवास आलेल्या एखाद्या वस्तूचे स्मरण वर्तमानात अनुभवास येणाऱ्या एखाद्या वस्तूच्या निमित्ताने होऊन 'हीच ती वस्तू आहे' अशा प्रकारचे होणारे अनुसन्धान हेच प्रत्यभिज्ञा म्हणून ओळखले जाते.



प्रत्यभिज्ञेमध्ये स्थल–काल सापेक्षता वगळून दिसून येणारे एकत्वाचे सूत्र लक्षात घेतले जाते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥४॥

**तद्देशकालाकारादीनवधूयानुषङ्गिकान्।**
**यथैकं वस्त्वनुस्यूतं प्रत्यभिज्ञानमात्मनः॥**

**श्लोकार्थ :** जसे देश, काल, आकार इत्यादी उपाधि विशेषांना बाजूला सारून पूर्वी अनुभवलेली वस्तू व आता वर्तमानात अनुभवली जात असलेली वस्तू यात अनुस्यूत असलेले आनुषंगिक एकत्व हीच आत्मस्वरूपाची प्रत्यभिज्ञा होय.



आत्मस्वरूपाची प्रत्यभिज्ञा कशी असते ते स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥५॥

**मायानुषङ्गसञ्जातकिञ्चिज्ज्ञत्वाद्यपोहनात्।**
**सर्वज्ञत्वादिविज्ञानं प्रत्यभिज्ञानमात्मनः॥**

**श्लोकार्थ :** मायेच्या अनुषंगाने उत्पन्न होणारे अल्पज्ञत्व बाजूला सारून होणारे आपल्या सर्वज्ञत्वाचे स्पष्ट विज्ञान हीच आत्मस्वरूपाची प्रत्यभिज्ञा होय.

**स्थाय्यात्मसाधनम् – आत्म्याच्या स्थीर स्वरूपाचे स्पष्टीकरण**

जन्मतःच बालकाला स्तनपान करण्याची जी प्रवृत्ती होते त्याचे कारण प्रत्यभिज्ञाच होय, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥६॥

**पूर्वजन्मानुभूतार्थस्मरणान्मृगशावकः।**
**जननीस्तन्यपानाय स्वयमेव प्रवर्तते॥**

**श्लोकार्थ :** पूर्वजन्मात अनुभूवलेल्या विषयांचे स्मरण जागृत होऊन हरिणाचे पाडस आपण होऊनच आईचे स्तनपान करावयास प्रवृत्त होत असते.





हाच मुद्दा अधिक स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।७।।

**तस्मान्निश्चीयते स्थायीत्यात्मा देहान्तरेष्वपि।**
**स्मृतिं विना न घटते स्तन्यपानं शिशोर्यतः।।**

**श्लोकार्थ :** लहान मूलांची स्तनपानाकडे होणारी प्रवृत्ति पूर्वस्मृतीशिवाय होणे शक्य नाही, हे लक्षात घेता देह बदलत असला तरी आत्मा स्थायी स्वरूपात तोच राहतो हेच यावरून निश्चित होते.



**प्रत्यभिज्ञाप्रामाण्यव्यवस्थापनम् – प्रत्यभिज्ञेची प्रमाण व्यवस्था**

प्रत्यभिज्ञा या संकल्पनेची सिद्धता प्रमाणांच्या सहाय्याने येथे वार्तिककारांनी केली आहे. प्रत्यभिज्ञेतील पूर्व स्मृती आत्मतत्त्वाची सिद्धता करणारी आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।८।।

**पूर्वत्रानुभवे काले स्मृतिकाले परत्र सन्।**
**आत्मा संस्काररूपेण स्मरत्यर्थं स्वनिष्ठितम्।।**

**श्लोकार्थ :** पूर्वी आलेला एखाद्या विषयाचा अनुभव परत घेत असताना उत्पन्न होणाऱ्या स्मृतिकाळात स्वरूपाचे ठायी प्रतिष्ठीत असणारा आत्माच त्या विषयांचे स्मरण संस्कारांच्या आधारावर करीत असतो.



स्मृती हे देखील एक प्रमाण आहे असे म्हटले जाऊ शकते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।९।।

**प्रत्यभिज्ञेति भावानां स्मृतिश्चेदाभिधीयते।**
**आत्मस्थैर्ये प्रमाणत्वं स्मृतिश्च प्राप्नुयात् कथम्।।**

**श्लोकार्थ :** भावरूप पदार्थाची स्मृती हीच प्रत्यभिज्ञा होय असे म्हणावयाचे झाल्यास आत्म्याचे स्थैर्य/नित्यता सिद्ध करण्यासाठी स्मृतीचे प्रामाण्य देखील स्वीकारावे लागेल.



तथापि स्मृती हे स्वतंत्र प्रमाण मानता येत नाही हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥१०॥

**स्मृतौ प्रकाशो नार्थस्य न चाप्यर्थस्य निश्चयः।**
**न चाप्यर्थानुभवयोरङ्गुल्योरिव सम्भवेत्॥**

**श्लोकार्थ :** स्मृती ने अर्थरूप विषयावर प्रकाश पडत नाही वा स्मृती ने अर्थरूप विषयाचा निश्चयही होत नाही अथवा दोन बोटे एकाच वेळी दिसू शकतात तसे अर्थाची प्रतीति व अनुभवरूप ज्ञान ही एकाच वेळी होऊ शकतात असेही नाही.



स्मृती विषयी अधिक स्पष्टीकरण देत वार्तिककार म्हणतात.....

॥११॥

**नानुभूतिविशिष्टस्य पदार्थस्य च दण्डिवत्।**
**सर्वत्राप्येवमित्येवं प्रसङ्गादिति तच्छृणु॥**

**श्लोकार्थ :** 'हा दण्डि-दण्डधारी यती आहे' या अनुभवासारखी एखाद्या वस्तू/पदार्थाची वैशिष्ट्यपूर्ण अनुभूती स्मृतीने होत नाही. त्याचप्रमाणे सर्व पदार्थांच्या स्मृतीतही अशाच प्रकारचा प्रसंग प्राप्त होत असल्याने उपस्थित शंकेचे साहजिकच निराकरण होते.



संस्कार आणि स्मृती यांचा परस्परसंबंध स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥१२॥

**प्राक्तनानुभवे नष्टे तदवष्टम्भसम्भवात्।**
**संस्कारसंज्ञात् सामग्र्यात् पौरुषाज्जायते स्मृतिः॥**

**श्लोकार्थ :** पूर्वी आलेला अनुभव नष्ट झाल्यानंतर त्या अनुभवाच्या आधारावर राहणाऱ्या संस्कार नामक सामग्रीच्या सहाय्याने पुरुषाचे ठायी स्मृती उत्पन्न होते.



एखादा विषय समोर नसतांनाही स्मृतीने त्याचा अनुभव घेता येतो हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥१३॥

**अवेद्यानुभवे नष्टे तदीयं विषयं प्रति।**
**अनुभावकमात्मानं बोधयत्यनपायिनम्॥**

**श्लोकार्थ :** प्रत्यक्ष विषयज्ञान नष्ट झाल्यानंतर त्या वस्तूच्या ज्ञानाच्या अनुभावक नित्य आत्म्याची सिद्धता साहजिकच होते.





आत्मस्वरूपाच्या सिद्धतेसाठी स्मृती कशी उपयोगी पडते ते स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१४।।

**विषये च प्रमुषिते नष्टे चानुभवे सति।**
**स्वविश्रान्तं स्मरत्यर्थं देवोऽ प्रमुषितस्सदा।।**

**श्लोकार्थ :** विषय दूर निघून जातात तेंव्हा आणि अनुभव देखील लय पावतो तेंव्हा स्व-रूपापासून केंव्हाही दूर न जाणारा स्व-विश्रान्त असा आत्माच त्या पदार्थांचा स्मृती रूपात अनुभव घेतो.



आत्मस्वरूपाच्या अनुभूतीवर आवरण घालणारी माया आणि आत्मस्वरूपाला प्रकट करणारी विद्या या परमेश्वराच्या शक्ती आहेत, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१५।।

**प्रमोषणं प्रमातृणां मायया तमसा कृतम्**
**मायाविद्ये प्रभोश्शक्ती भानोश्छायाप्रभोपमे।।**

**श्लोकार्थ :** मायेच्या तमोगुणात्मक प्रभावाने प्रमात्यापासून स्वरूप ज्ञान दूर केले जाते सूर्याच्या छाया व प्रकाश या जशा शक्ती आहेत तशाच माया व विद्या या परमेश्वराच्या शक्ती आहेत.



माया हि आवरण घालणारी शक्ती आहे तर विद्या हि आवरण दूर करणारी शक्ती आहे, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१६।।

**सर्वानाच्छादयेन्माया विद्या व्याक्षिप्य दर्शयेत्।**
**प्रत्यभिज्ञैव सर्वेषां प्रमाणानाञ्च साधनम्।।**

**श्लोकार्थ :** माया ही सर्व चराचराला आच्छादन करीत असते तर विद्या ही मायेच्या आवरणाला दूर करीत असते. प्रत्यभिज्ञा हेच या सर्व प्रमाणांचे साधन आहे.



मायेची विच्छेदशक्ती स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१७।।

**ईश्वरोऽन्योऽहमप्यन्य इति विच्छेदकारिणीम्।**
**व्याक्षिप्य विद्यया मायामीश्वरोऽहमिति स्मृतिः।।**

**श्लोकार्थ :** ईश्वर वेगळा आहे आणि मी वेगळा आहे अशा प्रकारे जीव आणि ईश्वर यांचा विच्छेद करणाऱ्या मायेला दूर करणारी विद्याच 'मी ईश्वर आहे' असा बोध घडविणारी स्मृती हीच प्रत्यभिज्ञा म्हणून ओळखली जाते.



आत्मस्वरूपाचे ज्ञान होण्यासाठी मायेचे आवरण दूर होणे आवश्यक आहे हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१८।।

**ईषत्प्रकाशोऽभूदीशः मायायवनिकावृतः।**
**सम्यगावरणापाये सहस्रांशुरिव स्फुरेत्।।**

**श्लोकार्थ :** मायेच्या आवरणाने आच्छादिलेल्या जीवरूपी ईश्वराचा प्रकाश अगदी थोडा पडतो मात्र ते मायेचे आवरण बाजूला सारले जाताच सहस्रांशु सूर्याच्या प्रकाशासारखा जीवाच्या ईशस्वरूपाचा दिव्य प्रकाश सम्यक् प्रकारे प्रकट होतो.



मायेचे आवरण केवळ आत्मस्वरूपाची ओळख पटल्यानेच दूर होऊ शकते. ते प्रमाणांच्या सहाय्याने दूर होत नाही अथवा कार्यकारण भाव समजून घेऊन ही दूर होत नाही, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१९।।

**न कारणानां व्यापारात् प्रमाणानां न वा पुनः।**
**प्रत्यभिज्ञापनं नाम मोहापसरणं परम्।।**

**श्लोकार्थ :** मायेच्या मोहावरणाचा क्षय करणे हे न तर कारण व्यापाराने शक्य होते वा न तर प्रमाणांच्या सहाय्याने शक्य होते ते केवळ प्रत्यभिज्ञेच्या बोधानेच होऊ शकते.



सर्व प्रमाणे ही व्यावहारीक असतात त्याने फक्त मायेचे आवरण दूर होते एवढेच. हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥२०॥

**यावन्ति सन्ति मानानि व्यवहारप्रवृत्तये।**
**तेषां मोहापसरणाद् व्यापारोऽन्यो न विद्यते॥**

**श्लोकार्थ :** जी कांही प्रमाणे आहेत ती सर्व व्यवहारासाठी प्रवृत्त झाली आहेत. अज्ञान मोहाचे आवरण दूर करण्याशिवाय त्यांचे दुसरे कोणतेही कार्य नाही.



देहाचे ठायी असलेले चैतन्य हे प्रकृतीने बांधलेले असते, हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

॥२१॥

**जडानृतपरिच्छिन्नदेहधर्माश्चिदात्मनि।**
**सत्यज्ञानसुखात्मत्वं मोहाद्देहेऽपि कल्प्यते॥**

**श्लोकार्थ :** जडता, परिवर्तनशीलता आणि परिच्छिन्नता हे देह धर्म चैतन्याचे ठायी अध्यारोपित केले जाऊन सत्य, ज्ञान व सुख हे धर्म देहाचे ठायी आरोपित केले जातात. हे अज्ञानच होय.



**विविध ख्यातिंचे – मतमतांतरांचे निराकरण**

ख्याती म्हणजे परमार्थ सत् विषयक सिद्धांत. जगत्–प्रपंचाच्या अनुभवाचे स्वरूप काय आहे याचे स्पष्टीकरण ख्यातीतून होते. पूज्यपाद आद्य शंकराचार्यांचा अद्वैत वेदान्त हा अनिर्वचनीय ख्याती मान्य करणारा आहे.अनिर्वचनीय ख्याती या संकल्पनेचे समर्थन करण्यासाठी वार्तिककारांनी येथे इतर ख्यातींचे निराकरण केले आहे.

**सत्ख्यातिनिरासः – सत्–ख्यातिचे निराकरण**

सत्–ख्यातिचे निराकरण करित वार्तिककार म्हणतात.....

॥२२॥

**शुक्तौ रजतमित्येवं यथा व्यामुह्यतेऽन्यथा।**
**सदेव रूप्यं चेद्भाति विलयस्ते न सिद्ध्यति॥**

**श्लोकार्थ :** शिंपल्याला चांदीचा तुकडा समजण्याची अज्ञानरूप भ्रान्ती जशी लोकांना मोहात पाडत असते त्याचप्रमाणे शिंपल्यावर भासमान प्रतीतिने दिसून येणारी चांदी सत् स्वरूप आहे असे म्हणावयाचे झाल्यास चांदीच्या प्रतीतिचा समूळ नाश केंव्हाही सिद्ध होऊ शकणार नाही.





**अख्यातिनिरासः - अख्यातिचे निराकरण**

अख्यातिचे निराकरण करित वार्तिककार म्हणतात...

।।२३।।

**नात्यन्तासप्रकाशेत नरशृङ्गादिवत्क्वचित्।**
**कान्ताकरादौ रजतमिति स्यात्स्मरणं भ्रमे।।**

**श्लोकार्थ :** जगत् प्रपंचाची प्रतीति नर-शृंग अर्थात माणसाच्या शिंगासारखी पूर्णतः असत् आहे असेही म्हणता येत नाही, भ्रामक कल्पनेतही स्त्रियांच्या हातावरील चांदीच्या आभुषणांचे स्मरण असतेच.



।।२४।।

**तेनेदं तुल्यमित्येवं स्यात्सादृश्यात्तु विभ्रमः।**
**पीतश्शङ्खो गुडस्तिक्त इत्यादौ नास्ति तुल्यता।।**

**श्लोकार्थ :** याची तुलना पिवळ्या रंगाचा शंख किंवा तिखट गुळ अशा संकल्पना करता येणार नाही. असे म्हणणे भ्रामकच ठरते.



**अन्यथाख्यातिनिरासः - अन्यथा-ख्यातिचे निराकरण**

अन्यथा-ख्यातिचे निराकरण करित वार्तिककार म्हणतात...

।।२५।।

**तादात्म्येन स्फुरति चेद्रजतत्वेन शुक्तिका।**
**विभ्रमो निरधिष्ठानो बाधो निरवधिर्भवेत्।।**

**श्लोकार्थ :** स्त्रीयांच्या हातावरील चांदी आणि शिंपल्याची चमक यातील तादात्म्यामुळेच शिंपला हा चंद्रप्रकाशात चांदीच्या तुकड्यासारखा भासतो. त्यास असत् म्हणावयाचे झाल्यास भ्रम अधिष्ठानरहित ठरून भ्रमाचा बाध निरवधी ठरेल.



**आत्मख्यातिनिरासः - आत्म-ख्यातीचे निराकरण**

आत्म-ख्यातीचे निराकरण करित वार्तिककार म्हणतात.....

।।२६।।

**बुद्धिस्थितंचेद्रजतं बाह्यत्वेन प्रतीयते।**
**गुञ्जादौ ज्वलनारोपे देहदाहः प्रसज्यते।।**

**श्लोकार्थ :** बुद्धीच्या ठायी स्थित चांदीची बाह्यरूपात प्रतीति होते असे म्हणावयाचे झाल्यास बाहेरचा गुंजेसारखा एखादा पदार्थ जळाल्यास देहदाहाचा

अनुभव यावयास हवा!



**अनिर्वचनीयख्यातिसाधनम् - अनिर्वचनीय ख्यातिचे प्रतिपादन**

शांकर वेदान्ताला मान्य असलेल्या अनिर्वचनीय ख्यातीचे प्रतिपादन करित वार्तिककार म्हणतात.....

।।२७।।

**युक्तिहीनप्रकाशत्वाद् भ्रान्तेर्न ह्यस्ति लक्षणम्।**
**यदि स्याल्लक्षणं किञ्चिद् भ्रान्तिरेव न सिद्ध्यति।।**

**श्लोकार्थ :** भ्रम हा युक्तिहीन विचारशून्य प्रतीति असल्यामुळे भ्रान्तीचे कोणतेही लक्षण नसते. भ्रान्तीचे एखादे लक्षण असते असे म्हणावयाचे झाल्यास ती भ्रान्तीच नाही असे सिद्ध होईल!



।।२८।।

**जलचन्द्रवदेकस्मिन् निर्भये रज्जुसर्पवत्।**
**प्रतीयते यथा स्वर्णे कारणे कटकादिवत्।।**

**श्लोकार्थ :** जलाशयातील चन्द्राच्या प्रतिबिम्बासारखी वा दोरीवर प्रतीत होणाऱ्या सर्पासारखी अथवा सोन्याचे ठायी अनुभवास येणाऱ्या अलंकारासारखी या जगत् प्रपंचाची अनुभूती एकमेवाद्वितीय निर्भय कारणरूप ब्रह्माचे ठायी येत असते.



।।२९।।

**उपात्ते रुप्यवच्छुक्तौ व्याप्ते यक्षपुरीव खे।**
**रश्म्यम्बुवत् स्फुरद्रूपे स्थाणौ चोरवदक्रिये।।**

**श्लोकार्थ :** ग्रहण केलेल्या चांदीच्या ठायी प्रतीत होणाऱ्या चांदीसारखी वा आकाशात दिसून येणाऱ्या गन्धर्वनगरी सारखी सूर्यप्रकाशात अनुभवास येणाऱ्या मृगजळासारखी वा खांबाचे ठायी प्रतीत होणाऱ्या चोरासारखी या जगत्-प्रपंचाची प्रतीति क्रियारहित ब्रह्माचे ठायी येत असते.



।।३०।।

**असत्कल्पमिदं विश्वमात्मन्यारोप्यते भ्रमात्।**
**स्वयम्प्रकाशं सद्रूपं भ्रान्तिबाधविवर्जितम्।।**

**श्लोकार्थ :** याप्रमाणे असत् कल्पनेमुळे स्वयंप्रकाश, सत्–स्वरूप, भ्रान्तिशून्य, बाधरहित आत्म्याचे ठायी हे विश्व अध्यारोपित केले जाते. अविवेकरूप अज्ञान मोहाचे आवरण दूर होताच.....



।।३१।।

**प्रत्यभिज्ञायते वस्तु प्राग्वन्मोहे व्यपोहिते।**
**देहाद्युपाधौ निर्धूते स्यादात्मैव महेश्वरः।।**

**श्लोकार्थ :** प्रत्यभिज्ञेच्या योगाने आत्मस्वरूपाची ओळख पटते. देहादिक उपाधी निवृत्त होताच आत्मा हाच परमेश्वर असल्याची अनुभूती येते.



।।३२।।

**स्मृतिः प्रत्यक्षमैतिह्यमित्यादीन्यपराण्यपि।**
**प्रमाणान्याप्तवागाह प्रत्यभिज्ञाप्रसिद्धये।।**

**श्लोकार्थ :** स्मृती, प्रत्यक्ष, ऐतिह्य आप्तवचन अशा अन्य प्रमाणांच्या सहाय्याने देखील प्रत्यभिज्ञेची सिद्धता होत असल्याचे म्हटले आहे.



।।३३।।

**इति श्री दक्षिणामूतिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे सप्तमोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** याप्रमाणे श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबंध ग्रन्थाचा सातवा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे सप्तमोल्लासः।।**
**।। मानसोल्लास ग्रन्थाचा सातवा उल्लास पूर्ण झाला।।**
**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा सातवा उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



ß

# DeLe ceevemeeuueeme Deä ceeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee DeeþJee Guueeme

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील आठव्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा आठवा उल्लास. या भागात प्रामुख्याने बंध आणि मोक्ष या विषयीचे प्रतिपादन प्रस्तुत करण्यात आले आहे.

**बंधमोक्षव्यवस्थोपपादनम् – बंध-मोक्ष व्यवस्था**

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील आठव्या श्लोकावरील वार्तिक खालीलप्रमाणे आहे.

।।१।।

**प्रकाशव्यतिरेकेण पदार्थः कोऽपि नास्ति चेत्।**
**परमार्थोपदेशान्तो व्यवहारः कथं भवेत्।।**

**श्लोकार्थ :** चैतन्य प्रकाशाशिवाय अन्य कोणताही पदार्थ अस्तित्वातच नाही तर परमार्थ बोध झाल्यानंतर व्यवहार घडणे कसे शक्य आहे.



।।२।।

**कस्य बन्धश्च मोक्षश्च बध्यते केन हेतुना।**
**मायायाः लक्षणं किं स्यादित्येवं परिपृच्छतः।।**

**श्लोकार्थ :** बन्ध आणि मोक्ष हे कोणाचे होतात? आणि त्याचे कारण काय? मायेचे लक्षण काय आहे? असे प्रश्न विचारले जाण्याची शक्यता असते.



।।३।।

**प्रश्नः स्यादुत्तरं वक्तुं प्रतिपत्तुं सुखेन च।**
**उक्तोऽर्थस्सप्तभिः श्लोकैः पुनः सङ्क्षिप्य कथ्यते।।**

**श्लोकार्थ :** वरील प्रश्नाचे उत्तर देण्याच्या हेतूने तसेच जिज्ञासूला विषय सहज समजून यावा यासाठी सातव्या श्लोकापर्यंत प्रतिपादन केलेला अर्थच पुढील श्लोकात संक्षेपाने पुनः मांडण्यात आला आहे.



।।४।।

**पौनरुक्त्यं न दोषोऽत्र शब्देनार्थेन वा भवेत्।**
**अभ्यासेन गरीयस्त्वत्वमर्थस्य प्रतिपाद्यते।।**

**श्लोकार्थ :** या प्रतिपादनामुळे शब्दाच्या पुनरूक्तीचा वा अर्थाच्या पुनरूक्तीचा दोष लागत नाही. विषयाच्या पुनरूक्तीने त्याचे महत्त्व प्रतिपादन करण्यात आले आहे.



**अस्यायमभिसन्धिः –**

विषयाचे अनुसंधान स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।५।।

**स्वयम्प्रकाशे सद्रुपेऽप्येकस्मिन् परमेश्वरे।**
**कार्यकारणसम्बन्धाद्यनेकविधकल्पना।।**

**श्लोकार्थ :** कार्यकारणसंबंध स्वीकारला म्हणजे स्वयंप्रकाश सत्–स्वरूप एकमेवाद्वितीय परमेश्वराचे ठायीच विश्वातील अनेकत्वाची कल्पना निर्माण होते.



।।६।।

**राहोश्शिरः सुषिः खस्य ममात्मा प्रतिमावपुः।**
**इत्यादिकल्पनातुल्या न पृथग्वस्तुगोचरा।।**

**श्लोकार्थ :** राहूचे शिर, आकाशाचे छिद्र, प्रतिमेचे शरीर, माझा आत्मा या सारख्या कल्पनांमध्ये त्या कल्पनेशिवाय वेगळा असा कोणताही वस्तुरूप पदार्थ अस्तित्वात नसतोच.



।।७।।

**उपास्योपासकत्वेन गुरूशिष्यक्रमेण च।**
**स्वामिभृत्यादिरूपेण क्रीडति स्वेच्छयेश्वरः।।**

**श्लोकार्थ :** उपास्य आणि उपासक या रूपात वा गरू–शिष्य परंपरेत तसेच स्वामी आणि सेवकाच्या भूमिकेत एकमेव परमेश्वरच स्वेच्छेने क्रिडा करीत असतो.



।।८।।

**पितरं प्रति पुत्रो यः पुत्रं प्रति पितैव सः।**

**एक एव हि नानेव कल्प्यते शब्दमात्रतः।।**

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील आठवा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

**।।८।।**

**विश्वं पश्यति कार्यकारणतया स्वस्वामिसम्बन्धतः**
**शिष्याचार्यतया तथैव पितृपुत्राद्यात्मना भेदतः।**
**स्वप्ने जाग्रति वा य एष पुरुषो मायापरिभ्रामितः**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

मायेच्या प्रभावाने भ्रमात पडलेला अज्ञानी जीव स्व-स्वामी संबंधाने कार्य-कारण संबंधाने, शिष्य-आचार्य संबंधाने वा पिता-पुत्राच्या संबंधाने भेदरूपाने जागृती अथवा स्वप्न या अवस्थांमध्ये जाणत असतो त्या केवळ अपरोक्षानुभूतीनेच जाणल्या जाऊ शकणाऱ्या एकमेवाद्वितीय आत्मचैतन्यरूप परमेश्वर श्री गुरू दक्षिणामूर्तीस माझा नमस्कार असो.



**श्लोकार्थ :** पित्यासाठी पुत्र जे कांही असतो तेच पुत्रासाठी पिता असतो, एकच आत्मस्वरूप पिता आणि पुत्र या दोहोतून अभिव्यक्त होत असते. त्यात वेगळेपणा असा कांही नाही. जो वेगळेपणा जाणवतो ती केवळ शब्दमात्र कल्पना होय.



।।९।।

**तस्मात्प्रकाश एवास्ति परमार्थनिरूपणे।**
**भेदप्रतीतिर्मिथ्यैव माययात्मनि कल्पिता।।**

**श्लोकार्थ :** तात्पर्य हेच की परमार्थ निरूपणाच्या दृष्टीने आत्मचैतन्याचे प्रकाशस्वरूप हेच काय ते अस्तित्वात आहे जी कांही भेद प्रतीति येते ती मायेच्या प्रभावाने आत्मचैतन्याचे ठायी कल्पिलेली मिथ्या प्रतीति मात्र होय.



**मिथ्यात्वस्वरूपम् - मिथ्या ज्ञानाचे स्वरूप**

मिथ्याज्ञानाचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१०।।

**मिथ्यात्वं नाम बाध्यत्वं सम्यग्ज्ञानोदये सति।**
**शिष्याचार्योपदेशादि स्वप्नवत् प्रतिभासते।।**

**श्लोकार्थ :** सम्यक्ज्ञानाचा उदय होताच मिथ्याज्ञानाचा पूर्णपणे बाध होऊन शिष्य-आचार्यांचा उपदेश यासारखी सर्व द्वैतानुभूती स्वप्नवत् असल्याचा अनुभव येतो.



**व्यवहारादेर्मिथ्यात्वम् - व्यवहारादिकांचे मिथ्यात्व**

व्यवहारादिकांचे मिथ्यात्व स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।११।।

**मिथ्याभूतोऽपि वेदान्तः सत्यमर्थं प्रबोधयेत्।**
**देवताप्रतिमावच्च चित्रवत्प्रतिबिम्बवत्।।**

**श्लोकार्थ :** जगत्-प्रपंचातील द्वैत व्यवहार हा एखादी देवतेची प्रतिमा, चित्र अथवा प्रतिबिम्ब यासारखा मिथ्या असला तरी देखील वेदान्तशास्त्रात त्या मागिल सत्य अर्थाचे प्रबोधन केले जाते.



।।१२।।

**सर्वोऽपि व्यवहारोऽयं मायायाः परिजृम्भणम्।**
**सुषुप्तिसदृशी माया स्वप्रबोधेन बाध्यते।।**

**श्लोकार्थ :** जगत् प्रपंचातील हा सर्व द्वैतव्यवहार हा मायेचाच विस्तार आहे. गाढ सुषुप्तिसारखी ही माया हे आत्मस्वरूपाच्या बोधाने बाधित होते.



।।१३।।

**युक्तिहीनप्रकाशस्य संज्ञा मायेति कथ्यते।**
**नासती दृश्यमाना सा बाध्यमाना न वा सती।।**

**श्लोकार्थ :** युक्ति-विवेकशून्य प्रतीति हीच 'माया' म्हणून ओळखली जाते. ती अनुभवास येत असल्यामुळे तिला असत् म्हणता येत नाही आणि तिचा बाध होत असल्यामुळे ती सत् म्हणता येत नाही.



।।१४।।

**न प्रकाशादियं भिन्ना छायेवार्कस्य तामसी।**
**न चाभिन्ना जडत्वेन विरोधान्नोभयात्मिका।।**

**श्लोकार्थ :** सूर्याच्या अंधकाररूपी छायेसारखी ती आत्मस्वरूप परमेश्वराच्या ज्ञानप्रकाशाहून वेगळी नाही आणि जड-अचेतन असल्यामुळे ती परमेश्वराशी एकरूपही नाही. जड आणि चेतन यात मूलभूत विरोध असल्यामुळे ती उभयात्मक अर्थात् जड-चेतन उभयरूप देखील म्हणता येत नाही.



।।१५।।

**स्वहेत्ववयवाभावान्नेयं सावयवोच्चते।**
**न चावयवहीना सा कार्यत्वेष्ववयवान्विता।।**

**श्लोकार्थ :** मायेच्या अस्तित्वाला अवयवांचा संघात कारणिभूत नसल्यामुळे ती सावयव आहे असे म्हणता येत नाही, तसेच मायेची जगत्-प्रपंचातील द्वैत व्यवहाररूप कार्ये अवयवांच्या सहाय्यानेच होत असल्यामुळे ती अवयवरहित आहे असेही म्हणता येत नाही.



।।१६।।

**अविचारितसिद्धेयं मायावेश्याविलासिनी।**

**पुरुषं वञ्चयत्येव मिथ्याभूतैः स्वविभ्रमैः।।**

**श्लोकार्थ :** विचाराने सिद्ध न होणारी ही अ-विचारीत व अ-सिद्ध अशी माया एखाद्या विलासप्रीय वेश्येसारखीच आहे. आपल्या मिथ्या विभ्रमांनी ती पुरुषाची वंचनाच करीत असते.



।।१७।।

**न तस्याः मूलविच्छेदमभिवाञ्छन्ति केचन।**
**तेषां पक्षे कथं मोक्षो मनसः सम्भविष्यति।।**

**श्लोकार्थ :** या मायेचा समूळ उच्छेद करण्याची इच्छा जोवर एखाद्या व्यक्तीच्या अंत:करणात उत्पन्न होत नाही तोवर त्यास मोक्ष तरी कसा प्राप्त होणार ? त्याच्या मनाचा मोक्ष कसा शक्य होणार ?



।।१८।।

**तिस्त्रोऽप्यवस्थाः मनसः जाग्रत्स्वप्नसुषुप्तयः।**
**चक्रवत्परिवर्तन्ते भेदभ्रान्त्येकहेतवः।।**

**श्लोकार्थ :** जगत्-प्रपंच व्यवहारात मनाला द्वैतानुभव देणाऱ्या भेद-भ्रान्तीचे एकमेव कारण असलेल्या जागृति-स्वप्न-सुषुप्ती या तीनही अवस्था एखाद्या चक्रासारख्या गोल-गोल फिरत असतात.



**बन्धाभावोपपादनम् - बंधाच्या अभावाचे प्रतीपादन**

बंधाच्या अभावाचे प्रतीपादन स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१९।।

**ताभिः करोति कर्माणि पुनस्तैर्बध्यते मनः।**
**मनसः केवलः साक्षी भानुवत् पुरुषः परः।।**

**श्लोकार्थ :** मायानिर्मित भेद-विभ्रमाच्या प्रभावाने जीवमात्र चांगले वाईट कर्माचरण करीत राहतो आणि त्या कर्माचरणाच्या प्रभावाने त्याचे मन पुन: बांधले जाते. सूर्य जसा या जगताचा साक्षी आहे तसाच जीवमात्राच्या मनाचा केवळ साक्षी असा एकमेवाद्वितीय परमपुरुषच आहे.



।।२०।।

**यथा प्राणिकृतैरर्कः कर्मभिर्नैव बध्यते।**
**तथा मनःकृतैरात्मा साक्षित्वान्नैव बध्यते।।**

**श्लोकार्थ :** ज्याप्रमाणे प्राणिमात्रांनी केलेल्या कर्मांने सूर्य बांधला जात नाही त्याचप्रमाणे मनाने केलेल्या कर्मांनी साक्षी चैतन्य पुरुषही बांधला जात नाही.



।।२१।।

**आत्मा करोति कर्माणि बध्यते मुच्यते च तैः।**
**इत्यौपचारिकी क्लृप्तिर्भ्रममात्रैव केवलम्।।**

**श्लोकार्थ :** आत्मा कर्म करतो, (कर्मांने) तो बांधला जातो व (परमार्थ बोधाने) तो मुक्त होतो असे म्हणणे ही केवळ एक औपचारिक कल्पना मात्र असून तो केवळ एक भ्रममात्र आहे.



।।२२।।

**धूमाभ्रधूलीनीहारैरस्पृष्टोऽपि दिवाकरः।**
**यथा छन्न इवाभाति तथैवात्माऽपि मायया।।**

**श्लोकार्थ :** ज्याप्रमाणे धूर, ढग, धूळ वा धुक्याचा स्पर्शही न होणारा सूर्य त्यापासून अलीप्त असला तरी त्यामुळे झाकला गेल्यासारखा भासतो. त्याचप्रमाणे चैतन्य स्वरूप प्रकाशमय आत्मा देखील मायेच्या आवरणाने झाकला गेल्यासारखे वाटते.



।।२३।।

**यथा लीलावशात् कैश्चिद् भ्राम्यमाणः कुमारकः।**
**भ्रमत्तत्पश्यति जगच्छतचन्द्रं नभस्थलम्।।**

**श्लोकार्थ :** जसे कोणा एखाद्या लहान मुलाला खेळवण्यासाठी म्हणून कोणि गरगर फिरवले असता त्याला हे सर्व जगच फिरत असल्यासारखे वाटते आणि आकाशात शेकडो चंद्र असल्यासारखे भासते.



।।२४।।

**तथैव मायया जीवो भ्रामितो वासनावशात्।**
**नानाकारमिदं विश्वं भ्रममाणं न पश्यति।।**

**श्लोकार्थ :** तसेच मायेच्या प्रभावाने फिरवल्या जाणाऱ्या जीवाला देखील वासनेच्या योगाने हा जगत्–प्रपंचही अनेक आकारांची भेदप्रतीति असल्यासारखा फिरताना दिसतो.





।।२५।।

**संसृज्य मनसा देवः संसरन्निव लक्ष्यते।**
**यथार्को जलसंसर्गाच्चलन्नानेव लक्ष्यते।।**

**श्लोकार्थ :** ज्याप्रमाणे जलाच्या संपर्काने सूर्य देखील अनेक रूपात असून चालत असल्यासारखे वाटते. त्याचप्रमाणे मनाच्या संपर्कात आलेला आत्मदेव देखील या जगत्–प्रपंचात भेद प्रतीति पावून गतिमान असल्यासारखे वाटत असते.



**योगस्य जीवन्मुक्तिसाधनता – योग हेच जीवन्मुक्तीचे साधन**

योग हेच जीवन्मुक्तीचे साधन असल्याचे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।२६।।

**योगाभ्यासवशाद्येन मनो निर्विषयं कृतम्।**
**निवृत्तः स पुमान् सद्यो जीवन्मुक्तो भविष्यति।।**

**श्लोकार्थ :** योगाभ्यासाच्या सामर्थ्याने ज्याने आपले चित्त निर्विषय केले आहे असा पुरुषच या जगत्–प्रपंचातील मायेच्या बंधनातून मुक्त होऊन या इहजन्मातच जीवनमुक्त होतो.



।।२७।।

**द्वासुपर्णौ च सयुजावभवन्मायया शिवः।**
**अजामेकां जुषन्नेकः नानेवासीदिति श्रुतिः।।**

**श्लोकार्थ :** 'द्वा सुपर्णा सयुजा' या ऋचेत श्रुतीने शिव–मायेच्या प्रभावाने एकत्रित राहणाऱ्या दोन सुवर्ण पक्षांचे वर्णन केले आहे. 'अजामेकां' या मंत्रातूनही श्रुतीने एक जन्मरहित–अजा प्रकृतीला एक पुरुष सेवन करीत असल्याचे म्हटले आहे आणि तो एकच अनेक नाम–रूपात द्वैताभासाने प्रकट झाला आहे असेही श्रुती वचन आहे.



।।२८।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादक।**
**प्रबन्धे मानसोल्लासे अष्टमोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री सुरेश्वराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्ध ग्रन्थाचा आठवा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे अष्टमोल्लासः।।**

**।। श्री मानसोल्लास ग्रंथाचा आठवा उल्लास पूर्ण झाला ।।**

**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा आठवा उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



ß

# DeLe ceevemeeuueeme veJeceeuueemeë

ceevemeeuueeme ûeLee®ee veJeJee Guueeme

## Féej eheemevee

Féej eHeemeveeJe<e³ee

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील नवव्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा नववा उल्लास. या भागात प्रामुख्याने ईश्वरोपासनेविषयी प्रतिपादन प्रस्तुत करण्यात आले आहे.

**ईशोपासनायाः मायानिवृत्त्युपायत्वम् – मायानिवृत्तीसाठी ईश्वरोपासना**

ईश्वरोपासना ही मायानिवृत्तीसाठी असते हे स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।१।।

**कथमेवंविधा माया निवर्तेतेति पृच्छतः।**
**ईश्वरोपासनारूपस्तदुपायः प्रकीर्त्यते।।**

**श्लोकार्थ :** अशा प्रकारची ही अनिर्वचनीय माया कशी निवृत्त होऊ शकते असा प्रश्न विचारला जाण्याची शक्यता लक्षात घेत मायेच्या निवृत्तीचा ईश्वरोपासनारूप उपाय येथे निरूपण करण्यात आला आहे.

❖❖❖

**अष्टविधप्रत्यक्षमूर्तीनामुपासना – अष्टविध मूर्तींची उपासना**

प्रत्यक्ष दिसून येणाऱ्या अष्टविध म्हणजे आठ प्रकारच्या मूर्तींची उपासना करावी हे सूचीत करित वार्तिककार म्हणतात.....

।।२।।

**षट् त्रिंशत्तत्त्वरूपासु परमेश्वरमूर्तिषू।**
**प्रत्यक्षेणोपलभ्यन्ते सर्वैरप्यष्टमूर्तयः।।**

**श्लोकार्थ :** छत्तिस तत्त्वांच्या रूपातून अभिव्यक्त होणाऱ्या परमेश्वराच्या मूर्तींपैकी आठ मूर्ती सर्व लोकांसाठी प्रत्यक्ष उपलब्ध असतात.

❖❖❖

।।३।।

**अनुमेयासु न मनः क्षिप्रमारोहतीत्यतः।**
**मूर्त्यष्टकमयीं ब्रूते गुरुः सर्वात्मभावनाम्।।**

**श्लोकार्थ :** अनुमानाने जाणल्या जाऊ शकणाऱ्या तत्त्वात सामान्य जिज्ञासू शिष्याची शिघ्र गती होत नाही हे लक्षात घेऊनच गुरूदेवांनी सर्वात्मभावना विकसीत होण्यासाठी हा उपदेश केला आहे.



**अस्यैवं सिद्धान्तः - या विषयीचा सिद्धान्त**

व्यष्टी-व्यक्ती आणि समष्टी- ब्रह्माण्ड (Microcosm and Macrocosm) यातील एकरूपता स्पष्ट करीत या विषया संदर्भात अधिक स्पष्टीकरण देत वार्तिककार म्हणतात...

।।४।।

**विराट्छरीरे ब्रह्माण्डे प्राणिनामपि विग्रहे।**
**षट्त्रिंशत्तत्त्वसङ्घातः सर्वत्राप्यनुवर्तते।।**

**श्लोकार्थ :** विराट पुरुषाच्या या ब्रह्माण्डरूपी शरीरात तसेच प्राणिमात्रांच्या पिण्डरूप शरीराचे ठायी छत्तिस तत्त्वांचा संघात विद्यमान असल्याचे सर्वत्र अनुभवास येत असते.



।।५।।

**व्याप्तिर्व्यष्टिशरीरेऽस्मिन् मनसो व्यष्टिरूपिणः।**
**तस्मात्सर्वात्मकमिदं स्वशरीरे विचिन्तयेत्।।**

**श्लोकार्थ :** या व्यष्टिरूप शरीराचे ठायी व्यष्टीरूप मनाची व्याप्ती आहे हे लक्षात घेऊन हे आपले स्वतःचे शरीरच सर्वात्मक आहे असे विशेष चिंतन करावे.



।।६।।

**व्यष्ट्युपासनया पुंसः समष्टिव्याप्तिमाप्नुयात्।**
**उपसङ्क्रामतीत्येवं दशकृत्व उपादिशत्।।**

**श्लोकार्थ :** व्यष्टीरूप उपासनेच्या सहाय्याने समष्टीरूप उपासनेची साधना करावी. व्यष्टी ते समष्टी हे अंतर उल्लंघून समष्टीभाव प्राप्त करण्यासाठी दशकृत्- दहा प्रकारच्या उपासनेचा उपदेश केला आहे.





पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील नववा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

।।९।।

**भूरम्भांस्यनलोऽनिलोऽम्बरमहर्नाथो हिमांशुः पुमा-**
**नित्याभाति चराचरात्मकमिदं यस्यैव मूर्त्यष्टकम्**
**नान्यत् किञ्चन विद्यते विमृशतां यस्मात् परस्माद्विभोः**
**तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये।।**

**श्लोकार्थ :**

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, सूर्य, चंद्र व आत्मा (पुरुष) याच परमेश्वराच्या आठ विग्रहमूर्ती असून या चराचर विश्वात नित्य अनुभवास येतात. या सर्वव्यापक परमेश्वर स्वरूपाहून वेगळे असे या विश्वात दुसरे कांहीच नाही असे विचारविमर्शा अंती ज्या परमेश्वराच्या कृपेने अनुभवास येते त्या श्री गुरूमूर्ती श्री दक्षिणामूर्तीला माझा नमस्कार असो.



।।७।।

**ब्रह्माण्डस्योदरे लोकाः सप्त भूरादयः स्मृताः।**
**मूलादिब्रह्मरन्ध्रान्तेष्वाधारेषु वसन्ति ते।।**

**श्लोकार्थ :** ब्रह्माण्डाच्या उदरात भूः इ. सात लोक स्थित असल्याचे सर्वज्ञातच आहे. मूलाधार चक्रापासून ते ब्रह्मरन्ध्रापर्यंत या पिण्डदेहाचे ठायी तेच लोक विद्यमान आहेत.



।।८।।

**वीणादण्डो महामेरूरस्थीनि कुलपर्वताः।**
**गङ्गा तु पिङ्गला नाडी यमुनेडा प्रकीर्तिता ।।**

**श्लोकार्थ :** शरीरातील मेरूदण्ड हाच वीणादण्ड महामेरू असून लहान–मोठ्या अस्थी हेच कुलपर्वत आहेत. पिंगला नाडी हीच गंगा असून इडा नाडी हीच यमुना आहे.



।।९।।

**सरस्वती सुषुम्नोक्ता नाड्योऽन्याः पुण्यनिम्नगाः।**
**द्वीपाः स्युर्धातवः सप्त स्वेदबाष्पादयोऽब्धयः।।**

**श्लोकार्थ :** सुषुम्ना नाडी हीच सरस्वती असून इतर नाड्या याच पुण्यसरिता होत या शरीरातील सात धातू हीच या पृथ्वी तलावरील सात द्विपे असून स्वेद, बाष्प इत्यादिक या समुद्राचे प्रतिक होत.



पिंड–ब्रह्मांडातील अग्नीतत्त्वाचे साम्य खालील दोन श्लोकातून स्पष्ट केले आहे.....

।।१०।।

**मूले तिष्ठति कालाग्निरस्थिमध्ये च बाडवः।**
**वैद्युतोऽग्निः सुषुम्नायां पार्थिवो नाभिमण्डले।।**

**श्लोकार्थ :** मूलाधारचक्राचे ठायी कालाग्नी प्रतिष्ठीत असून अस्थींमध्ये वडवाग्नी स्थित आहे. सुषुम्नेच्या ठायी विद्युत्–अग्नी असून नाभिमण्डलाचे ठायी पार्थिव अग्नी विद्यमान आहे.



।।११।।

**हृदि तिष्ठति सूर्याग्निः कपाले चन्द्रमण्डलम्।**
**नक्षत्राण्यपराण्याहुः नेत्रादीनीन्द्रियाण्यपि।।**

**श्लोकार्थ :** हृदयाचे ठायी सूर्याग्नी असून कपालाचे ठायी चन्द्राग्नी आहे. नेत्रादिक अन्य इन्द्रियांचे ठायी विविध नक्षत्रांचे तेज प्रतिष्ठीत आहे, असे म्हटले आहे.



पिंड–ब्रह्मांडातील वायू–प्राणतत्त्वाचे साम्य प्रदर्शित करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१२।।

**धार्यन्ते वायुभिर्लोकाः यथा प्रव्रहणादयः।**
**प्राणादिभिर्दशविधैर्धार्यते वायुभिर्वपुः।।**

**श्लोकार्थ :** जसे प्रवहणादिक वायू या लोकांची धारणा करतात. त्याचप्रमाणे दहा प्रकारचे प्राण या शरीराची धारणा करीत असतात.



।।१३।।

**प्राप्येडापिङ्गले प्राणः मूलात् सूर्यस्वरूपतः।**
**नासिकाभ्यां बहिर्गत्वा लीयते द्विषडङ्गुले।।**

**श्लोकार्थ :** मूलाधार चक्रापासून उत्थान पावून इडा–पिंगला नाड्यांना प्राप्त झालेला सूर्यस्वरूप प्राण दोन नाकपुड्यातून बाहेर पडून बारा अंगुले एवढ्या अंतरावर लय पावतो.



।।१४।।

**अष्टाङ्गुलेन सोमात्मा नाडीभ्यामन्तराविशन्।**
**मलमूलत्रमरुच्छुक्राण्यपानो विसृजेद्बहिः।।**

**श्लोकार्थ :** सोमरूप झालेला तोच अपानरूप प्राण नासापुटापासून आठ अंगुले अंतरावर इडा–पिंगला नाड्यांत शरीराच्या अंतर्भागात राहतो. मलमूत्राचे विसर्जन, शुक्रोत्सर्जन व वायू–उत्सर्जन ही कार्ये हा अपान वायू करतो.



।।१५।।

**अग्नीषोममयो भूत्वा सुषुम्नारन्ध्रमाश्रितः।**
**आब्रह्मरन्ध्रमुद्‌गच्छन्नुदानो वर्धते स्वयम्।।**

**श्लोकार्थ :** अग्नी आणि सोमाचे रूप धारण करणारा सुषुम्नाछिद्राचा आश्रय घेऊन ब्रह्मरन्ध्रापर्यंत उड्डाण करणारा उदान वायू हा खुद्द प्राणच होय.



।।१६।।

**व्यापयेद्वपुषि व्यानः भुक्तान्नरसमन्वहम्।**
**सन्धुक्षणं समानस्तु कायाग्नेः कुरुते सदा।।**

**श्लोकार्थ :** संपूर्ण शरीरात व्याप्त राहून नाड्यांच्या अंतर्भागात संचार करणारा व्यान खालेल्या अन्नरसाला प्रतीदिन सर्वत्र पाहोचवत असतो, तर समान वायू शरीरातील उष्णता नित्य कायम ठेवीत असतो.



।।१७।।

**नागो हिक्काकरः कूर्मो निमेषोन्मेषकारकः।**
**क्षुतं करोति कृकरः देवदत्तो विजृम्भणम्।।**

**श्लोकार्थ :** नाग नामक प्राण उचकी आणणारा आहे, कूर्म नामक प्राण पापण्यांची उघडझाप करणारा आहे, कृकर नामक प्राण शिंक आणण्यास कारणिभूत ठरतो तर देवदत्त नामक प्राण जांभई आणावयास कारणिभूत ठरतो.



।।१८।।

**स्थौल्यं धनञ्जयः कुर्यात् मृतं चापि न मुञ्चति।**
**आकाशो बहिरप्यन्तरवकाशं प्रयच्छति।।**

**श्लोकार्थ :** धनंजय नामक प्राण स्थूलता आणतो आणि तो मृत शरीरासही सोडत नाही. आकाश हे शरीराच्या आत-बाहेर मोकळी जागा उपलब्ध करून देत असते.



।।१९।।

**चन्द्रार्कौ कालनेतारौ प्राणापानौ शरीरिणाम्।**
**साक्षी पुरुष इत्येवं मूर्त्यष्टकमिदं वपुः।।**

**श्लोकार्थ :** काल नियंत्रण करणारे चन्द्र-सूर्य हेच शरीरधारी प्राण्यांचे ठायी

प्राण व अपानाच्या रूपाने प्रतिष्ठीत आहेत. या सर्वाचा साक्षी महेश्वरच असे हे शरीरच परमेश्वराच्या आठ मूर्तींच्या स्वरूपात चिंतनीय आहे.



**अष्टाङ्गयोगः –**

अष्टांग योगाचे संक्षिप्त निरूपण करीत वार्तिककार म्हणतात...

**।।२०।।**

**समनस्कमिदं योगी सेवमान उपासकम्।**

**अष्टाङ्गयोगयुक्तः सन्नमनस्कं स गच्छति।।**

**श्लोकार्थ :** समनस्क राहणारा योगी ध्यान अभ्यासपूर्वक उपासना करीत अष्टांगयोगाचे साधन करीत राहीला म्हणजे अमनस्क अवस्थेत प्राप्त होतो.



**यमनिरूपणम् – यमांचे निरूपण**

योगशास्त्रातील 'यम' ही संकल्पना स्पष्ट करीत वार्तीककार म्हणतात...

**।।२१।।**

**मनःप्रसादः सन्तोष मौनमिन्द्रियनिग्रहः।**

**दयादाक्षिण्यमास्तिक्यमार्जवं मार्दवं क्षमा।।**

**श्लोकार्थ :** मनाचा प्रसाद, सन्तोष, मौन, इन्द्रियनिग्रह, दया, दाक्षिण्य, आस्तिकता, आर्जव, मार्दव, क्षमा....



**।।२२।।**

**भावशुद्धिरहिंसा च ब्रह्मचर्यं स्मृतिर्धृतिः।**

**इत्येवमादयोऽन्ये च मनस्साध्या यमाः स्मृताः।।**

**श्लोकार्थ :** भावशुद्धी, अहिंसा, ब्रह्मचर्य, स्मृती, धृती यासह जे कांही आणखीही इतर मनःसाध्य सद्गुण आहेत ते 'यम' म्हणून ओळखले जातात.



**नियमनिरूपणम् – नियमांचे निरूपण**

योगशास्त्रातील 'नियम' ही संकल्पना निरूपण करीत वार्तिककार म्हणतात...

**।।२३।।**

**स्नानं शौचं क्रतुस्सत्यं जपो होमश्च तर्पणम्।**

**तपो दानं तितिक्षा च नमस्कारः प्रदक्षिणम्।।**

**श्लोकार्थ :** स्नान, शौच, नित्य–पूजा कर्म, सत्य, जप, होम, तर्पण, तप, दान, तितिक्षा, नमस्कार, प्रदक्षिणा....

॥२४॥

**व्रतोपावासाद्याश्चान्ये कायिकाः नियमाः स्मृताः।**

**श्लोकार्थ :** व्रत, उपवास ही आणि इतर कायिक संयमाची साधने 'नियम' म्हणून ओळखली जातात.

**आसननिरूपणम् – आसनाचे निरूपण**

योगशास्त्रातील 'आसन' ही संकल्पना स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**स्वस्तिकं गोमुखं पद्मं हंसाख्यं ब्राह्ममासनम्॥**

**श्लोकार्थ :** स्वस्तिक, गोमुख, पद्म, हंस या नावाने ओळखली जाणारी ही ब्रह्मासने होत.



॥२५॥

**नृसिंहं गरुडं कूर्मं नागाख्यं वैष्णवासनम्।**

**श्लोकार्थ :** नृसिंह, गरुड, कूर्म, नाग नामक आसने वैष्णवासने होत.



॥२६॥

**वीरं मयूरं वज्राख्यं सिद्धाख्यं रौद्रमासनम्॥**

**श्लोकार्थ :** वीर, मयूर, वज्र, सिद्ध ही आसने रौद्र आसने होत.



**योन्यासनं विदुश्शाक्तं शैवं पश्चिमतानकम्।**

**श्लोकार्थ :** शाक्त साधक योनीआसन स्वीकारतात तर शैव साधक पश्चिमोत्तानासन स्वीकारतात.



॥२७॥

**निरालम्बनयोगस्य निरालम्बनमासनम्॥**

**निरालम्बतया ध्यानं निरालम्बः सदाशिवः।**

**श्लोकार्थ :** निरालम्ब योगाचे आसन निरालम्ब असून त्याचे ध्यानही निरालम्ब स्वरूपाचे असते. परमेश्वर सदाशिव हा निरालम्ब स्वरूपच आहे.



**प्राणायाम निरूपणम् – प्राणायामाचे निरूपण**

योगशास्त्रातील 'प्राणायाम' ही संकल्पना स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**रेचकः पूरकश्चैव कुम्भकः प्राणसंयमः॥**



**श्लोकार्थ :** रेचक, पूरक व कुम्भक यासह प्राणसंयम पूर्ण होतो.

**प्रत्याहारनिरूपणम् – प्रत्याहारचे निरूपण**

योगशास्त्रातील 'प्रत्याहार' ही संकल्पना निरूपण करीत वार्तिककार म्हणतात...

।।२८।।

**इन्द्रियाणां समस्तानां विषयेभ्यो निवारणम्।**
**प्रत्याहार इति प्रोक्तं प्रत्याहारार्थवेदिभिः।।**

**श्लोकार्थ :** सर्व इन्द्रियांना त्यांच्या विषयांपासून परावृत्त करणे हाच प्रत्याहार होय असे प्रत्याहार जाणणारांनी म्हटले आहे.



**धारणानिरूपणम् – धारणेचे निरूपण**

योगशास्त्रातील 'धारणा' ही संकल्पना निरूपण करीत वार्तिककार म्हणतात...

।।२९।।

**आधारे क्वापि मनसः स्थापनं धोरणोच्यते।**

**श्लोकार्थ :** एखाद्या आधाररूप आलम्बनावर चित्त स्थापित करणे हीच धारणा म्हणून ओळखली जाते.



**ध्याननिरूपणम् – ध्यानाचे निरूपण**

योगशास्त्रातील 'ध्यान' ही संकल्पना स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

**ब्रह्मविष्णुशिवादीनां चिन्ता ध्यानं प्रचक्षते।।**

**श्लोकार्थ :** ब्रह्मा, विष्णु, शिव इत्यादिकांचे चिन्तन हेच ध्यान म्हणून सांगितले आहे.



**समाधिनिरूपणम् – समाधिचे निरूपण**

योगशास्त्रातील 'समाधि' ही संकल्पना स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात...

।।३०।।

**ध्यानादस्पन्दनं बुद्धेः समाधिरभिधीयते।**
**अमनस्कसमाधिस्तु सर्वचिन्ताविवर्जितम्।।**

**श्लोकार्थ :** ध्यानाने बुद्धीचे स्पंदनरहित होणे यासच समाधी असे म्हटले जाते. समाधी अवस्था ही अमनस्क असून सर्व प्रकारच्या चिन्तनांपासून मुक्त अशी अवस्था होय.



**योगचिह्नानि – योगातील प्रगतीची लक्षणे**

योगशास्त्रातील 'योगातील प्रगतीची लक्षणे' निरूपण करीत वार्तिककार

म्हणतात...

॥३१॥

**चित्ते निश्चलतां याते प्राणो भवति निश्चलः।**
**चित्तस्य निश्चलत्वाय योगं सध्यानमभ्यसेत्॥**

**श्लोकार्थ :** चित्त निश्चलभावास प्राप्त झाले म्हणजे प्राण देखील निश्चल होतो. चित्ताची निश्चलता प्राप्त करण्यासाठी योगाचा ध्यानासह अभ्यास करावा.



॥३२॥

**आकुञ्चनमपानस्य प्राणस्य च निरोधनम्।**
**लम्बिकोपरि जिह्वायाः स्थापनं योगसाधनम्॥**

**श्लोकार्थ :** अपानवायूचे आकुंचन व प्राणवायूचा निरोध तसेच जिभेला तालूस्थानी स्थापन करून खेचरी मुद्रा साधणे यासच योगसाधन असे म्हटले जाते.



॥३३॥

**चित्ते निश्चलतां याते प्राणे मध्यपथं गते।**
**चिह्नान्येतानि जायन्ते पञ्चभूतजयात् पृथक्॥**

**श्लोकार्थ :** चित्तास निश्चलता प्राप्त होऊन प्राणाची गती मध्यम–सुषुम्नामार्गाने होऊ लागली म्हणजे पंचमहाभूतांचा जय साधला जाऊन योग्याचे ठायी खालील चिह्ने प्रकट होऊ लागतात.



॥३४॥

**मलमूत्रकफाल्पत्वमारोग्यं लघुता तनोः।**
**सुगन्धः स्वर्णवर्णत्वं प्रथमं योगलक्षणम्॥**

**श्लोकार्थ :** मल, मूत्र, कफ इत्यादिकांचे कमी होणे, आरोग्य वृद्धी होऊन शरीर हलके होणे, शरीराला सुगन्ध येऊन कांती सोन्यासारखी तेजस्वी होणे हे योगसाधना साध्य होत असल्याचे पहिले लक्षण होय.



॥३५॥

**कण्टकाग्रेष्वसङ्गत्वं जलपङ्केष्वमज्जनम्।**
**क्षुत्तृडादिसहिष्णुत्वं द्वितीय योगलक्षणम्॥**

**श्लोकार्थ :** काट्याच्या टोकांनी बोचले न जाणे, पाणि वा चिखल यात न बुडणे, तहान–भूक सहन होणे हे योगाचे दुसरे लक्षण होय.



।।३६।।

**बह्वन्नपानभौक्तृत्वमातपाग्निसहिष्णुता।**
**दर्शन श्रवणं दूरात् तृतीयं योगलक्षणम्।।**

**श्लोकार्थ :** पुष्कळ अन्नपान करण्याचे सामर्थ्य, उष्णता वा अग्नीचा ताप सहन करण्याची क्षमता, दूर–दर्शन व दूरश्रवण यासारख्या असामान्य इन्द्रिय क्षमता हे योगसाधना साध्य होत असल्याचे तिसरे लक्षण होय.



।।३७।।

**मण्डूकप्लवनं भूमौ मर्कटप्लवनं द्रुमे।**
**आकाशगमनञ्चेति चतुर्थं योगलक्षणम्।।**

**श्लोकार्थ :** जमिनीवर बेडकासारख्या उड्या मारता येणे, वृक्षावरून माकडासारखे फिरता येणे, वा आकाशगमन हे योग साध्य होत असल्याचे चौथे लक्षण आहे.



।।३८।।

**ज्ञानं त्रिकालविषयमैश्वर्यमणिमादिकम्।**
**अनन्तशक्तितत्त्वञ्च पञ्चमं योगलक्षणम्।।**

**श्लोकार्थ :** तिनही काळातील विषयांचे ज्ञान, अणिमादीक अष्ट महासिद्धींचे ऐश्वर्य आणि अनन्त शक्ती सामर्थ्य संपन्नता हे योगसाध्य होण्याचे पाचवे लक्षण होय.



।।३९।।

**प्राणे सुषुम्नां संप्राप्ते नादोऽन्तः श्रूयतेऽष्टधा।**
**घण्टादुन्दुभिशङ्खाब्धिवीणावेण्वादितालवत्।।**

**श्लोकार्थ :** प्राण जेंव्हा सुषुम्ना नाडीत प्रवेश करतो तेंव्हा घंटा, दुन्दुभि, शंख, समुद्र, वीणा, बासरी इत्यादिकांसारखा आठ प्रकारचा लयबद्ध अंतर्ध्वनी ऐकू येतो.



**।।४०।।**

**तनूनपात्तटित्तारातारेशतपनोपमम्।**
**ब्रह्मनाडीं गते प्राणे बिम्बरूपं प्रकाशते।।**

**श्लोकार्थ :** प्राण जेंव्हा ब्रह्म-सुषुम्ना नाडीत प्रवेश करतो तेंव्हा अग्नी, विद्युत, तारे, चन्द्र, सूर्य यासारखा बिम्बरूप दिव्य प्रकाश प्रकट होतो.



**।।४१।।**

**श्वासाश्चरन्ति यावन्तः मनुष्यस्य दिनं प्रति।**
**तावन्ति योजनान्यर्कः श्वासे श्वासे प्रधावति।।**

**श्लोकार्थ :** मनुष्याचे प्रतिदिन जेवढे श्वासोच्छ्वास होतात तेवढी योजने प्रत्येक श्वासातून सूर्य धावत असतो.



**सोऽहमित्यस्य प्रणवात्मकत्वम् - सोऽहम् मंत्र आणि प्रणव**

दिवसभर सातत्याने चालणाऱ्या सोऽहम् मंत्राचा प्रणव जपाशी असलेला संबंध स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

**।।४२।।**

**एकविंशतिसाहस्त्रं षट्शतं श्वाससङ्ख्यया।**
**सोऽहमित्युच्चरत्यात्मा मत्रं प्रत्यहमायुषे।।**

**श्लोकार्थ :** मनुष्यांची प्रतिदिन श्वास संख्या एकविस हजार सहाशे एवढी असून तितक्या वेळा जीवात्मा रोज आयुष्य टिकविण्यासाठी 'सोऽहम्' मंत्राचे उच्चारण करीत असतो.



**।।४३।।**

**सकारञ्च हकारञ्च लोपयित्वा प्रयोजयेत्।**
**सन्धिं वै पूर्वरूपाख्यं ततोऽसौ प्रणवो भवेत्।।**

**श्लोकार्थ :** स-कार आणि ह-काराचा लोप करून पूर्वरूप नामक सन्धीला निश्चितरूपाने प्रायोजित केले म्हणज तोच प्रणव होतो.



।।४४।।

**अकारश्चाप्युकारश्च मकारो बिन्दुनादकौ।**
**पञ्चाक्षराण्यमून्याहुः प्रणवस्थानि पण्डिताः।।**

**श्लोकार्थ :** अ-कार, उ-कार, म-कार, बिन्दू आणि नाद अशी पांच अक्षररूप प्रणवस्थाने असल्याचे पण्डित मुनीजनांनी म्हटले आहे.



।।४५।।

**ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्चापीश्वरश्च सदाशिवः।**
**तेष्वक्षरेषु तिष्ठन्ति षट्त्रिंशत्तत्त्वसंयुताः।।**

**श्लोकार्थ :** ब्रह्मा, विष्णु व रूद्र या देवता ईश्वर आणि सदाशिव या पांच अक्षरांचे ठायी छत्तिस तत्त्वांशी संयुक्त होऊन प्रतिष्ठीत आहेत.



।।४६।।

**गुरुप्रसादाल्लभते योगमष्टाङ्गलक्षणम्।**
**शिवप्रसादाल्लभते योगसिद्धिञ्च शाश्वतीम्।।**

**श्लोकार्थ :** अष्टांग लक्षण योग गुरुप्रसादाने प्राप्त होतो तर शाश्वत योगसिद्धी शिवप्रसादाने प्राप्त होते.



।।४७।।

**सच्चिदानन्दरूपाय बिन्दुनादान्तरात्मने।**
**आदिमध्यान्तशून्याय गुरूणां गुरवे नमः।।**

**श्लोकार्थ :** बिन्दू आणि नादाच्या अंतर्यामी रूपाने वास करणाऱ्या सत्-चित्-आनन्द स्वरूप आदि-मध्य व अन्त नसलेल्या परात्पर गुरूस माझा नमस्कार असो.



।।४८।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे नवमोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे श्री सुरेश्वराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा अर्थ प्रतिपादन करणाऱ्या मानसोल्लास नामक प्रबन्ध ग्रन्थाचा नववा उल्लास पूर्ण झाला.



**।।इति श्रीमानसोल्लासे नवमोल्लासः।।**
**।। येथे श्री मानसोल्लास ग्रंथाचा नववा उल्लास पूर्ण झाला।।**
**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ति स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा नवम उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



ß

# DeLe ceevemeeuueeme oMeceeuueemeë

## ceevemeeuueeme ûeLee®ee oneJee Guueeme

## HeÀuePeIee

पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील दहाव्या श्लोकावरील श्री सुरेश्वराचार्यांच्या मानसोल्लास नामक वार्तिकाचा हा दहावा उल्लास. या भागात प्रामुख्याने फलश्रुतीविषयी प्रतिपादन प्रस्तुत करण्यात आले आहे.

**स्तोत्रफलश्रुतिः – श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राची फलश्रुती**

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा नित्य पाठ करण्याचे व त्याचा अभ्यास करण्याचे फळ काय ते स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१।।

**परिच्छिन्नमहम्भावं परित्यज्यानुषङ्गिकम्।**
**पूर्णाहम्भावलाभोस्य स्तोत्रस्य फलमुच्यते।।**

**श्लोकार्थ :** अनुषंगिक स्वरूपाच्या परिच्छिन्न अहंभावाचा पूर्णतः त्याग घडून 'मी पूर्ण आहे' अशा सर्वात्मक अहंभावाचा लाभ होतो. हेच या स्तोत्राचे फळ म्हटले आहे.



**इदमत्राकूतम्** –

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा नित्य पाठ करून त्याचा अभ्यास करणारास कोणते फळ प्राप्त होते ते स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२।।

**पुत्रपौत्रगृहक्षेत्रधनधान्यसमृद्धयः।**
**अर्वाचीनाश्च सिद्ध्यन्ति स्वर्गपातालभूमिषु।।**

**श्लोकार्थ :** या स्तोत्राचे पठण करणारास स्वर्ग, पाताल वा भूमीवर कोठेही पुत्र, पौत्र, गृह, क्षेत्र, धन, धान्य समृद्धीरूप अर्वाचीन लाभ प्राप्त होतात.



पूज्यपाद आद्य शंकराचार्य विरचित् श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रातील दहावा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

।।१०।।
**सर्वात्मत्वमिति स्फुटीकृतमिदं यस्मादमुष्मिन् स्तवे**
**तेनास्य श्रवणात्तथार्थमननाद् ध्यानाच्च सङ्कीर्तनात्।**
**सर्वात्मत्वमहाविभूतिसहितं स्यादीश्वरत्वं स्वतः**
**सिद्ध्येत्तत् पुनरष्टधा परिणतं चैश्वर्यमव्याहतम्।।**

**श्लोकार्थ :**

या स्तोत्रात येथे सर्वात्मभावाचे स्पष्टपणे प्रतिपादन करण्यात आलेले आहे. त्याचे श्रवण, अर्थममन, ध्यान व संकीर्तन केले असता महाविभूतीसह सर्वात्मभाव प्राप्त होतो. एवढेच काय या स्तोत्राच्या पठणाने ईश्वराची प्राप्ती होती. शिवाय त्यायोगे मायेच्या परिणामरूप अष्ट महासिद्धीरूप ऐश्वर्याची प्राप्ती होते.



।।३।।

**पाके प्रवर्तमानस्य शीतादिपरिहारवत्।**
**प्रासङ्गिकाश्च सिद्ध्यन्ति स्तोत्रेणानेन सर्वदा।।**

***श्लोकार्थ :*** स्वयंपाक करावयास प्रवृत्त होणाऱ्या माणसाची थंडी जशी आपोआपच दूर होते तसेच या स्तोत्र पठणाने अनेक प्रासंगिक लाभ सहजच प्राप्त होतात.



।।४।।

**ऐश्वर्यमीश्वरत्वं हि तस्य नास्ति पृथक् स्थितिः।**
**पुरुषे धावमाने हि छाया तमनुधावति।।**

***श्लोकार्थ :*** मनुष्य पळत गेला तर त्याची सावली देखील त्याच्या मागे जशी पळत जाते तसेच ईश्वरत्व आणि ऐश्वर्य यांची स्थिती होऊन ती या स्तोत्र पठण करणाराच्या मागे धावत येतात.



।।५।।

**अनन्तशक्तिरैश्वर्य निष्यन्दाश्चाणिमादयः।**
**स्वस्येश्वरत्वे संसिद्धे सिद्ध्यन्ति स्वयमेव हि।।**

***श्लोकार्थ :*** ऐश्वर्य हे अनन्तशक्तीरूप असून अणिमादीक सिद्धी या त्यातून टपकलेले कांही कणमात्र होत. ईश्वरत्वाची सम्यक् प्राप्ती झाली म्हणजे ही सर्व ऐश्वर्ये व सिद्धी आपोआपच प्राप्त होतात.



।।६।।

**यदीयैश्वर्यविप्रुङ्भिः ब्रह्मविष्णुशिवादयः।**
**ऐश्वर्यवन्तो भासन्ते स एवात्मा सदाशिवः।।**

***श्लोकार्थ :*** ज्याच्या महान् ऐश्वर्याच्या कणमात्र लाभाने ब्रह्मा-विष्णू आणि महेश हे ऐश्वर्य संपन्न झाल्याचे दिसतात तो सदाशिवच परमात्मा आहे.



।।७।।

**पुष्पमानयता गन्धो विनेच्छामनुभूयते।**
**पूर्णाहम्भावयुक्तेन परिच्छिन्नाः विभूतयः।।**

***श्लोकार्थ :*** या स्तोत्राच्या पाठकास ईच्छा नसतांनाही फुलांचा सुगंध अनुभवास

येतो. 'मी पूर्ण आहे' असा सर्वात्मभाव ज्यास प्राप्त होतो त्यास अशा मर्यादित विभूतीमत्त्वाचा लाभ होतोच.



**अष्टसिद्धिविवेचनम् – अष्टसिद्धींचे निरूपण**

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्राचा नित्य पाठ करून त्याचा अभ्यास करणाऱ्यास अष्टमहासिद्धी प्राप्त होतात. या सिद्धींचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।८।।

**अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा।**
**प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वञ्चाष्टसिद्धयः।।**

**श्लोकार्थ :** अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ती, प्राकाम्य, ईशित्व आणि वशित्व अशा आठ महासिद्धी आहेत.



अणिमा सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।९।।

**अत्यन्तमणुषु प्राणिष्वात्मत्वेन प्रवेशनम्।**
**अणिमासंज्ञमैश्वर्यं व्याप्तस्य परमात्मनः।।**

**श्लोकार्थ :** अत्यंत व्यापक अशा परमात्म्याचा अत्यंत लहान अशा प्राणिमात्रांचे ठायी आत्मरूपाने प्रवेश हीच अणिमा नामक सिद्धी होय.



महिमा सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१०।।

**ब्रह्माण्डादिशिवान्तायाः षट् त्रिंशत्तत्त्वसंहतेः।**
**बहिश्च व्याप्यवृत्तित्वमैश्वर्यं महिमाह्वयम्।।**

**श्लोकार्थ :** ब्रह्माण्डापासून ते शिवापर्यंतची छत्तिस तत्त्वे बाहेरून व्यापण्याचे सामर्थ्य हेच महिमा नामक ऐश्वर्य होय.



गरिमा सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।११।।

**परमाणुसमाङ्गस्य समुद्धरणकर्मणि।**
**गौरवे मेरुतुल्यत्वं गरिमाणं विदुर्बुधाः।।**

**श्लोकार्थ :** परमाणुसारखे लहान शरीर असणारास उचलावयास जावे तो

मेरुपर्वता सारखे वजन वाटणे यासच विद्वज्जनांनी गरिमा नामक सिद्धी म्हटले आहे.



लघिमा सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१२।।

**महामेरुसमाङ्गस्य समुद्धरणकर्मणि।**
**लाघवे तूलतुल्यत्वं लघिमानं विदुर्बुधाः।।**

**श्लोकार्थ :** मेरूपर्वतासारखे विशाल शरीर असणारास उचलावयास जावे तो कापसासारखे हलके वाटणे यासच विद्वज्जनांनी लघिमा नामक सिद्धी म्हटले आहे.



प्राप्ती सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१३।।

**पातालवासिनः पुंसो ब्रह्मलोकावलोकमन्।**
**प्राप्तिर्नाम महैश्वर्यं सुदुप्रापमयोगिनाम्।।**

**श्लोकार्थ :** पाताळात वास करणाऱ्या पुरुषाला ब्रह्मलोक पाहता येणे हेच प्राप्ती नामक ऐश्वर्य आहे जे योगसिद्धी नसणारांना प्राप्त होणे मोठे दुष्करच आहे.



प्राकाम्य सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१४।।

**आकाशगमनादीनामन्यासां सिद्धिसम्पदाम्।**
**स्वेच्छामात्रेण संसिद्धिः प्राकाम्यमभिधीयते।।**

**श्लोकार्थ :** आकाशगमनादिक अन्य सिद्धींची अनायासे होणारी प्राप्ती तसे मनात इच्छा होताच तिची पूर्तता होणे यासच प्राकाम्य असे म्हटले जाते.



'प्राकाश्य' सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१५।।

**स्वशरीरप्रकाशेन सर्वार्थानां प्रकाशनम्।**
**प्राकाश्यमिदमैश्वर्यमिति केचित् प्रचक्षते।।**

**श्लोकार्थ :** आपल्या स्वतःच्या शरीराच्या प्रकाशाने सर्व विषय-वस्तू प्रकाशित

करण्याचे सामर्थ्य 'प्राकाश्य' नामक ऐश्वर्य होय असे कांही विचारवंतांचे मत आहे.



'ईशित्व' सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१६।।

**स्वेच्छामात्रेण लोकानां सृष्टिस्थित्यन्तकर्तृता।**
**सूर्यादीनां नियोक्तृत्वमीशित्वमभिधीयते।।**

**श्लोकार्थ :** आपल्या स्वेच्छामात्रेकरून लोकांची निर्मिती स्थिती व लय साधणे तसेच सूर्यादिकांवर नियंत्रण करण्याचे सामर्थ्य हेच 'ईशित्व' म्हणून ओळखले जाते.



'वशित्व' सिद्धीचे स्वरूप स्पष्ट करीत वार्तिककार म्हणतात.....

।।१७।।

**सलोकपालाः सर्वेऽपि लोकाः स्ववशवर्तिनः।**
**तदैश्वर्य वशित्वाख्यं सुलभं शिवयोगिनाम्।।**

**श्लोकार्थ :** सर्व लोकपालांसह सर्व लोकांना आपल्या वशात ठेवण्याचे सामर्थ्य हेच 'वशित्व' नामक ऐश्वर्य असून शिवयोग्याला ते अत्यंत सुलभ असते.



।।१८।।

**यस्त्वेवं ब्राह्मणो वेत्ति तस्य देवा वशे स्थिताः।**
**किं पुनः क्ष्मापतिव्याघ्रव्यालस्त्रीपुरुषादयः।।**

**श्लोकार्थ :** अशा प्रकारे जाणणाऱ्या ब्राह्मणाला देव देखील वश होतात तर मग राजा, सिंह, व्याल, स्त्रीया वा पुरुष इत्यादिकांची काय कथा ?



वेदान्त अध्ययनाचा सर्वात मोठा लाभ सर्वात्मभाव हाच आहे. वार्तिककार म्हणतात.....

।।१९।।

**स्तोत्रमेतत् पठेद्धीमान् सर्वात्मत्वं च भावयेत्।**
**अर्वाचीने स्पृहां मुक्त्वा फले स्वर्गादिसम्भवे।।**

**श्लोकार्थ :** स्वर्गादिकात प्राप्त होणाऱ्या तुच्छ भोगांच्या इच्छेचा त्याग

करून या स्तोत्राचा पाठ करणारा बुद्धिमान पुरुष लवकरच सर्वात्मभावास प्राप्त होतो.



।।२०।।

**सर्वात्मभावसाम्राज्यनिरन्तरितचेतसाम्।**
**परिपक्वसमाधीनां किं किं नाम न सिद्ध्यति।।**

**श्लोकार्थ :** सर्वात्मभाव साम्राज्याचे ठायी सातत्याने चित्त एकाग्र करून परिपक्व समाधी सिद्ध करणारास काय प्राप्त होणार नाही ?



।।२१।।

**स्वर्गादिराज्यं साम्राज्यं मनुते न हि पण्डितः।**
**तदेव तस्य साम्राज्यं यत्तु स्वाराज्यमात्मनि।।**

**श्लोकार्थ :** आत्मज्ञानी पुरुष स्वर्गादीक राज्य वा साम्राज्याची इच्छाच करीत नसतो. त्याचे आत्मस्वरूप स्वाराज्य हेच त्याचे साम्राज्य असे.



।।२२।।

**सर्वात्मभावानावन्तं सेवन्ते सर्वसिद्धयः।**
**तस्मादात्मनि साम्राज्यं कुर्यान्नियतमानसः।।**

**श्लोकार्थ :** सर्वात्मभाव प्राप्त करणारास सर्वसिद्धी प्राप्त होतात म्हणून चित्तस्थैर्याचा अभ्यास करीत आत्मसाम्राज्य प्राप्तीचे प्रयत्न करावे.



**उपसंहार:**

श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील निरूपणाचा उपसंहार श्रुतीवचनाने करीत वार्तिककार म्हणतात.....

।।२३।।

**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ।**
**तस्यैतैऽकथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः।।**

**श्लोकार्थ :** ज्याची दक्षिणामूर्ती परमेश्वराचे ठायी पराभक्ती असते, जशी देवाचे ठायी असते तशीच सद्गुरूचे ठायी असते त्यासच येथे प्रतिपादन केलेल्या अर्थाचा महानुभव येतो.



।।२४।।

**प्रकाशात्मिकया शक्तया प्रकाशानां प्रभाकरः।**
**प्रकाशयति यो विश्वं प्रकाशोऽयं प्रकाशताम्।।**

**श्लोकार्थ :** जो प्रकाशस्वरूप आहे, प्रकाशित करणारांचाही प्रकाश आहे, जो आपल्या शक्तीने हे विश्व प्रकाशित करीत असतो तोच नित्य प्रकाश परमात्मा होय.



।।२५।।

**इति श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रार्थप्रतिपादके।**
**प्रबन्धे मानसोल्लासे दशमोल्लाससंग्रहः।।**

**श्लोकार्थ :** येथे भगवान् पूज्यपाद परमहंस परिव्राजकाचार्य श्री शंकर भगवत् पूज्यपाद शिष्य श्री सुरेश्वराचार्य कृत् दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील मानसोल्लास प्रबंध ग्रंथाचा दहावा उल्लास पूर्ण झाला.



**।। इति श्रीमानसोल्लासे दशमोल्लासः।।**
**।।श्री मानसोल्लासाचा दहावा उल्लास पूर्ण झाला।।**



**येथे श्रीमद् प.प. आद्य शंकराचार्यांच्या 'श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रम्' या स्तोत्रग्रंथावरील 'मानसोल्लास' नामक प.प. श्री सुरेश्वराचार्यकृत् वार्तिक ग्रंथाचा दशम उल्लास मराठी भावानुवादासह पूर्ण झाला.**



**इति श्रीसुरेश्वराचार्यकृतं मानसोल्लासाख्यं श्री दक्षिणामूर्तिस्तोत्रभावार्थवार्तिकं समाप्तम्**

**येथे श्रीमद् परमहंस परिव्राजकाचार्य आद्य शंकराचार्यांचे शिष्य असलेल्या श्री सुरेश्वराचार्यांनी रचलेले श्री दक्षिणामूर्ती स्तोत्रावरील श्री मानसोल्लास नामक वार्तिक मराठी भावानुवादासह पूर्ण झाले.**



## संदर्भ ग्रंथ सूची

१. डॉ. सच्चिदानन्दमिश्र (२००८), श्रीमत्सुरेश्वराचार्यविरचितः मानसोल्लासः- महामहोपाध्याय-वेदान्तविशारद-श्रीमदनन्तकृष्णशास्त्रिकृता मानसोल्लासवर्धिनी, श्रीदक्षिणामूर्तिमठ, प्रकाशन, वाराणसी

२. श्रीमहेशानन्दगिरि-श्रीदक्षिणामूर्तिपीठाधीश्वराचार्यमहामण्डलेश्वर-(२०१४), श्रीमत्सुरेश्वराचार्यविरचितः मानसोल्लासः श्रीदक्षिणामूर्तिमठ, प्रकाशन, वाराणसी.

३. सदानन्द (२००१) वेदान्तसार : श्रीनृसिंहाश्रम टिका-चौखम्बा वाराणसी.



## संदर्भ संकेत

| | | |
|---|---|---|
| १. | ईशावास्स उपनिषद् | (ई.उ.) |
| २. | केन उपनिषद् | (के.उ.) |
| ३. | कठ उपनिषद् | (क.उ.) |
| ४. | मुंडक उपनिषद | (मु.उ.) |
| ५. | मांडुक्य उपनिषद् | (मां.उ.) |
| ६. | ऐतेरय उपनिषद् | (ऐ.उ.) |
| ७. | तैत्तिरीय उपनिषद् | (तै.उ.) |
| ८. | श्वेताश्वतर उपनिषद् | (श्वे.उ.) |
| ९. | प्रश्न उपनिषद् | (प्र.उ.) |
| १०. | छान्दोग्य उपनिषद् | (छा.उ.) |
| ११. | बृहदारण्यक उपनिषद् | (बृ.उ.) |
| १२. | ब्रह्मसूत्र | (ब्रसू.) |
| १३. | श्रीमद् भगवद् गीता | (गी.) |
| १४. | श्री ज्ञानेश्वरी | (श्री. ज्ञा.) |
| १५. | ऋग्वेद संहिता | (ऋ) |
| १६. | श्रीमद् महाभारत शांतिपर्व | (महा. शांति) |
| १७. | महर्षी पतंजलीचे योगसूत्र | (यो.सू.) |
| १८. | ईश्वरकृष्णाची सांख्यकारिका | (सां.का) |



